प्रकाशक
पंडित अनंत कुलकर्णी
कुलकर्णी ग्रंथागार
१८६ शनवार, पुणें २

प्रकाशन ९८ वें

मुखपृष्ट
चित्रकार मुळगांवकर

मुद्रक
शंकर रामचंद्र दाते
यशवंत छापखाना
२९० सदाशिव, पुणें २.

आडगाव वसलं ......

सूर्य-चंद्राच्या उदयास्ताची आवर्तनं होत राहिलीं ऋतुराजाचीं प्रसादचिन्हं नियमानं प्रकट होऊं लागली. पावसाळे येत राहिले हिवाळ्यातलं हिरवं नवल आडगावच्या जीवनात कस ओतूं लागलं आकाशानं जे जे दिलं ते ते आडगावानं आदरानं घेतलं मातीला राबवायला आणि मातीत राबायला आवश्यक असलेले श्रम आणि श्रद्धा आडगावात प्रतिक्षणी प्रतिवर्धित होत राहिली !

मूर्तीची प्रतिष्ठा झाली मंदिर उभविली गेली प्रार्थना होऊं लागल्या श्रद्धेच्या अढळ आणि अभंग चौथऱ्यावर बसलेल्या प्रस्तरावर शेंदराचे थरावर थर चढले वास्तुकला हाताळली गेली हवेतले हेलकावे हेरले. आडगावात आणणारे आणि आडगावाबाहेर नेणारे रस्ते रुळून घाटदार झाले. गावातल्या विहिरी गारडहन आणि गोड्या पाण्यानं तुडुंब दिसूं लागल्या ऊर भरून थटलेल्या वात्सल्य मूर्तीच्या आवेगानं निसर्ग सदैव सिद्धार्पण दिसूं लागला. गावातली आणि गावाम्भोवतालची झाडं वाढत आडगावच्या वस्तीचं वय वाढवीत राहिली न खडणारं काळं डोंब पाणी, काळी कसदार भूमि या गोष्टींनी वस्तीला रमविता रमविता कायमचं बांधून टाकलं !

मग माणसातल्या मस्तीचा धिंगाणा सुरू झाला ......

जवळच्या दहापंधरा कोसात आडगावाच्या चौधऱ्याचं नाव अनेककारणांनी अनेकमुखी झालं होतं !

अनायासेच चारचौघात नाव होऊन थोरामोठ्याच्या बैठकीत गादीतक्क्याला मानानं बसण्याची आकांक्षा असलेल्या एकाद्या कुटुंबातल्या कर्त्या पुरुषाची स्त्री गर्भार असली तर मुलगीच व्हावी असे नवस केले जात.

होराशास्त्र उलगडल जाई. मुलगी झाली की विद्वान् गणल्या जाणाऱ्या ब्राह्मणाकडून जातक वर्तविल जाई. मुलगी चागल्या मुहूर्तावर जन्मल्यामुळ आणि म्हणून ती भाग्यमती असल्यामुळ फार मोठ्या घरांत पडेल, हे अदाज लिहून ठेवले जात.

त्या वेळच फार मोठे घर आडगावच्या चौधऱ्यांखेरीज जवळपास कुठं ऐकिवात नव्हत !

मग साहजिकच मुलीला जोजवताना जी गाणी म्हटली जात त्यात चौधऱ्याच कुळ उजळण्यासाठी अवतरलेल्या या तारामतीची गर्भित स्तुति असे !

दुसऱ्या एकाद्या घरात अशा जन्माच जरा दबकतच स्वागत होत असे. मुलगी झाली आणि ती सुवर्णी, नाकी डोळी नीटस आणि देखणी असली की, कपाळावर हात मारून भावी काळच्या अनेक सकटपरपराना कारण ठरेल अस ते दुश्चिन्हच मानल जाई !

मुलगी आणि तीहि रूपमती ! निष्प्राण करून आडगावाच्या चौधऱ्यांच्या नजरेपासून तिला कायमच दडवून ठेवाव किवा आताच विद्रूप करून दुर्मति चौधऱ्याच्या ती नजरेत भरणार नाही, अस कराव अस वाटत असे !

आडगावाच्या चौधऱ्याचा नाममहिमाच असा होता !

एकादा धनको कर्जवसुलीसाठी ऋणकोच्या घरीं येई. जातीच्या कर्जबाजारी माणसाप्रमाणे त्याच्याकडून काही वायदे सकारण वा अकारण टळलेले असत. शपथेवरली भरीव आश्वासन म्हणजे पोकळ थापा ठरत.

मग साहजिकच धनको दाराची चौकट सोडायला तयार नाही असं पाहून ऋणको म्हणे, "भले ! अगदी आडगावच्या चौधऱ्यासारखाच तगादा दिसतो आहे तुझा! "

" पण दिलेल कर्ज मात्र आडगावच्या चौधऱ्यासारख खोट नाही अं ...... ! "

" तें आलं लक्षात ! "

चौधऱ्याचा तगादा मोठा चिवट व तितकाच चावरा असे !

केलेल्या वायद्यावर रकम दिली नाही तर कुळान अंगाला राख लावून निघून जावं, किंवा घरादाराची आणि प्रसगी प्राणाचीहि आशा सोडावी, हे अगदी ठरून गेल होत !

यात्रेच्या अथवा तशाच इतर रहदारीच्या गर्दीत उंची पोशाक केलेला एकादा ऐटबाज आणि आकडू माणूस धसमुसळ करून माणसांना रेटीत आणि सारीत पुढ घुसू लागला की धक्का लागून चिडलेली माणस त्या दिमाखाकड बारकाईन पाहात आणि म्हणत, " अहो, आडगावचे चौधरी ! जरा माणसासारख चला ना ! "

आडगावचे चौधरी डामडौल करीत असत हे खर होत. पण ते माणसासारख चालत वागत नव्हते की काय कोण जाणे !

पोशाखी माणसान ते ऐकल कीं, 'आडगावचे चौधरी' हे सहजच लाभलेल नामाभिधान भूषण मानाव की दूषण समजाव हे न समजल्यामुळं तो ओशाळून जात असे.

एकाद्या धर्मप्रवण आणि दानशूर यजमानाकड सुग्रास आणि कडोसरीला ओझं करणारी सभावना मिळविलेला ब्राह्मण जेवणाची स्तुति करूं लागला आणि यजमानाच्या सढळ हातांचे कौतुक करूं लागला की, तें ऐकणारा परिचित म्हणे, " साभाळ रे बाबा ! आडगावच्या चौधऱ्याची दक्षिणा न ठरो म्हणजे मिळविली ! "

" चौधऱ्याची दक्षिणा" हा सभावनेचा एक मनोरजक पर्याय होता.

आपल्या दानशूरतेचं प्रदर्शन करण्यासाठी चौधरी लाबलाबचे ब्राह्मण बोलावीत. त्याना आग्रहान चागल जेऊ घालीत ते मागतील ती दक्षिणा देत

सुप्रसन्न झालेला ब्राह्मणगण उघड्या तोडान आणि सैल जिभेन चौधऱ्याना आयुरारोग्य आणि धनधान्याच्या वैपुल्याचा आशीर्वाद देऊन आडगावच्या शिवेबाहेर पडला की, लुबाडला जात असे!

लुबाडलेली दक्षिणा मागल्या दारान चौधऱ्याच्या 'वरवाड्या'वर येऊन पडल्याशिवाय राहात नसे!

चौधऱ्याच्या दक्षिणेला असा अर्थ होता!

सधनतेचा चौधऱ्यावर जसा वरदहस्त राहिला तसा कगालपणाहि त्याच्या घरातून नागडा हिंडून गेला!

चौधऱ्याच्या घरी खाऊन माणस मरतील एवढ कधी वैपुल्य दिसे तर कधी कधी दुपारची भ्रात पडे अशातच एकादा पाहुणा आला आणि तूप आणायच झाल की नोकर दोन भाडी घेऊन घरातून बाहेर पडे. पाहुणा चाणाक्ष नसला तर चौधऱ्याच्या घरी भाड्यानी भरून येणाऱ्या तुपाच्या कल्पनेन थक्क होऊन जात असे.

--एक भाड विकायच आणि त्याच्या रकमेतून दुसऱ्या भाड्यात येईल तेवढ तूप आणायच हा त्यातला सकेत होता!

अशा दाहक अडचणी चौधऱ्याच्या उबरठ्यावर उभ्या असलेल्या लोकानी पाहिल्या, तसा त्याच्या 'वरवाड्यात' वैपुल्यान धुमाकूळ घातलेलाहि त्याना दिसला!

मात्र हे वैपुल्य आडगावातल्या नाहीतर आसपास असलेल्या गावाच्या घराघरातून जबरीन ओढून आणलेल असे. गावकऱ्याचे गळे दाबल्याखेरीज चौधऱ्याना समाधानाचे श्वास टाकता येत नसत. गांवकऱ्याच्या उपासमारीवर त्याचे तृप्तीचे ढेकर निघत. चौधऱ्याची उपासमार होऊ लागली की गावावर गडातर आल अस खुशाल समजाव! ते मजेत दिवस काढीत

आहेत असं आढळल की, जवळपासच्या एकाद्या तरी गांवावर दरोडा पडला असला पाहिजे, अस निश्चित समजून घ्याव !......

चौधरी आजारी आहेत अशी एकदा बातमी 'वरवाड्या'हून निघाली की, ती फार दूरवर पोचत असे. किंवा ती तशी पोचली जावी अशीहि योजना नसेल कशावरून ?

मग 'वरवाड्या'च्या प्रवेशद्वाराशी फार लाबलाबची मडळी कमी-अधिक सचित आबट चेहरा करून आत प्रवेश मिळविण्यासाठी थाबत. कारभारी आणि पहारेकरी शिकवून ठेवलेले आणि परपरेत मुरून निघालेले असल्यामुळ त्या जमावाची न्याहाळणी, पाहणी करीत. मागल्या दाराचे आणि पुढल्या दाराचे अशी त्या जमावाची वर्गवारी होई....

'पुढल्या दाराच्यां'ना मागल्या दारान प्रवेश करणारासबधी वाटे की, ती मडळी स्त्रीवर्गाच्या परिचयाची, आप्तप्राय प्रियतम अशी आणि चौधऱ्याच्या घराण्यासाठी निकट परिचय असलेली माणस असावी.

पुढल्या दाराची माणस चौधऱ्यावर असलेल्या कर्जाच्या वसुलीसाठी आलेली असत. चौधऱ्याची प्रकृति तोळामासा होऊन आपली रकम बुडणार तर नाही, या शकेन ते आलेले असत. अशा शकाखोराना प्रवेश मिळताच मोठ विलक्षण दृश्य दिसे. हातात वेताची छडी घेऊन तोडान काही पुट-पुटत आणि जमिनीवर छडीचे प्रहार करीत बैठकीत एक मात्रिक बसलेला असे. हुडहुडी भरल्याच सोग केलेले चौधरी सारखे चळचळ कापू लागत. त्याना भूतबाधा झाली असावी, असे पाहणाऱ्यांस वाटावे असाच एकंदर तेथला सच असे. मात्रिक छडीच्या फटकाऱ्यासरशी विचारी,

"कोण आहेस तू ?"

"ब्रह्मराक्षस !"

"चौधऱ्यांना का धरलस ?"

"ते सपत्तिमान आहेत म्हणून !"

"केव्हा सोडणार त्यांना ?"

"तेवढाच सधन असा एकादा सावकार मिळाल्यावर !"

वाड्यात प्रवेश केलेला माणूस अतिशय घाईन निघून जाई. जणू चौधऱ्यांना लागलेला ब्रह्मराक्षसच त्याला धरायला धावला आहे !

मग मात्र 'पुढच्या दारा'शी थाबलेली कोणतीच आसामी वाड्यात प्रवेश मिळविण्याच धाडस करीत नसे !

चौधऱ्याना एकादी सरकारी रक्कम मिळायची झाली तर कचेरीत असाच भला मोठा जमाव त्याच्याबरोबर असे. चपराशी न् कारकुनाना त्याच मोठ नवल वाटे मात्र रक्कम मिळताच चौधरी मागच्या दारानं निघून जात आणि कचेरीचा व्हरान्डा अडवून बसलेला तो जमाव मग आडगावाच्या दिशेन घाईन जाई. ती माणसं कर्जाच्या वसुलीसाठी आलेली असत त्याना चौधऱ्याची भेट कित्येक दिवस व्हावयाचीच नाही. पुढे भेट होऊन तरी काय उपयोग ? कारण आलेली रक्कम चौधऱ्यानी एव्हांना फस्त करून टाकलेली असे !

दगलबाजी, डाकूगिरी, द्वेष, अहता, वामगमन, लुच्चेगिरी अशा अनेक अवगुणाच्या प्रकर्षांच उदाहरण देताना आडगावच्या चौधऱ्याचा उल्लेख निघाल्याशिवाय रहात नसे !

शौर्याचा आदर्श म्हणजे आडगावचे चौधरी ! आणि क्रौर्याची परिसीमा म्हणजेहि आडगावचे चौधरी हे लोक पहात आले होते आणि सांगत आले होते !

असं सागतात की, नानाजी नावाच्या चौधऱ्याला फार मोठ्या रक्कमेची भलती नड पडली ! जवळपास, रामोशाना घेऊन रात्रीचं 'डहान' मारायला एकादा देशमुख, देसाई त्या काळी उरला नव्हता की त्या कारवाईत आणखी काही अडचणी होत्या, कोण जाणे !

नानाजी चौधरी फार बेचैन झाले होते, हे मात्र खरं !

'विठ्ठल मारोती' 'यादवराव नाना' हे शाही पेशकारीवर होते, तोवर आडगांवकर चौधऱ्याविरुद्ध होणाऱ्या एकूण एक तक्रारी 'नजर अंदाज' केल्या जात. नानाजी वसूल केलेली सगळीच मालगुजारी हडप करून बसत. ती आलीच नाही अस कळल तर राजधानीच्या खजीन्यात बिन-बोभाट रक्कम दाखल केली जाई. कारण यादवराव नानाची धाकटी सून म्हणजे नानाजी चौधऱ्याची थोरली मुलगी ! आणि नानाजीच द्वितीय कुटुब म्हणजे विठ्ठल मारोतीची ज्येष्ठ कन्या !

ही सोयीरसगाई आडगावकराच्या साऱ्या दुर्वर्तनाच सुतक साभाळून घेई !

[प्रत्येक पावलागणिक काळाला बदलायची खोड नसती तर काळचानं पाढर मुळीच जवळ केलं नसत !]

काळ बदलला !

नवाब शकील जग हा शाही पेशकार झाला !

मालगुजारी थकलेल्या बाकीसह ताबडतोब दाखल करण्यासाठी आडगावच्या चौधऱ्याच्या नावान दौलताबादी कागदावर काळयाभोर शाईंत लिहिलेल्या मोहोरेदार अक्षरातल्या 'मोहरबाज' आणि 'मोहरबद' 'फैमा-यशी' 'वरवाडया'वर गुदरू लागल्या

तिसऱ्या 'फैमायशी'ला नानाजीचा चेहरा पार उतरून गेला. गुड-घ्यात डोक घालून ते बराच वेळ बसले.

जातखुद्द राजधानीला जाऊन आणि मुठी दाबून ही भानगड आणखी कांही दिवस लांबणीवर टाकता आली तर पाहावी म्हणून नानाजींनी 'बल्दा' (राजधानीच लाडक उपनाव) गाठला !

शकीलजगांना त्यानी नजराणा पाठविला. 'जुकाम' (पडस) झाल्या-मुळं 'ना तवानी' (अशक्तता) फार वाढली होती. म्हणून पेशकारांच्या देवडीवरून नानाजीना विनाभेटीचच परत याव लागल.

आणखी तीन चार दिवसानी भेटीचा एकदा प्रयत्न करावा अस त्यांनी ठरविल.

भेटीत काय सभाषण होईल, आपण कोणत्या प्रश्नाना काय उत्तर द्याव, याचा ते विचार करीत अन् रकमेची जुळवाजुळव कशी करतां येईल या विचारान तर ते हैराण होऊन जात !

शिणलेल्या मेदूला जरा तकवा आणण्यासाठी ते रात्री 'बल्दा' पाहायला निघाले.

राजधानीतली रात्र पाहण्यासारखी होती म्हणूनच की काय जिकडं तिकड रोषणाई दिसत होती लालबाग नावाच्या मोहल्यात मद्याच्या फेसात मदिराक्षीच्या नजराचा वेध घेतला जात होता. पण्यागनाचा झिरझिर उन्मादक वेश आणि प्रसाधन धुदकारलेल्या नजराना बोचत होत. नर्तिकाच्या नूपुर झकारान, मुरेल आवाजान आणि ढगदार ठुमरीन विलास-मदिर भरून गेली होती मधूनच होणाऱ्या अगमोडीन मस्त झालेल्या 'सफेद पोश' प्रेक्षक समुदायातून शब्द निघत होते, "वाहवा ! वा ! क्या खूब ! "

त्या काळी 'व्यकासानी' नावाची एक रूपसपन्न आणि सुप्रसिद्ध नर्तिका बल्द्याच्या नवाबात फार 'लाडली' होऊन राहिली होती. आडगावच्या चौधऱ्यानी तिच्या प्रशस्त बैठकीत प्रवेश केला एका रिकाम्या स्थानावर बसल्यावर बैटकीतल्या प्रेक्षकाचे चेहरे न्याहळले त्याच्या परिचयाचे उबर-ग्याचे विलासी नवाब प्रेक्षकात होते नजरानजर होताच आदाब अर्ज झाला परस्परानी पुढ होऊन हातात हात मिळविले आणि मग दोघहि हवापाण्याच्या गोष्टी करीत एकमेकाजवळ बसले. तोच 'सानी' आली नवाबसाहेबानी 'हीच ती जरा पहा तर खरी' असा कोपर टोचून इषारा केला चौधऱ्यानी एकवार चेहरा न्याहळला आणि ते पानाच्या तबकाला हातहि न लावता उठले, ते किळस आल्याचा उद्‌गार काढीतच— "थू थू थू थूऽ ! "

आपली चादीच्या मुठीची 'शानदार' काठी उचलून ते तत्काळ बाहेर पडले !

एका बड्या पाहुण्याला इथ अपमानकारक अस काय वाटल, ते इतर प्रेक्षकाना समजल नसाव ! आपल्याकडून काही 'कुसूर' झाला की काय या शकेन सानी क्षणभर व्यथित झाली.

उबरग्याच्या नवाबानी चौधऱ्याना दाराबाहेर गाठल न् विचारल, "क्यूऽ ? चौधरीजी ! क्या बात है ? असे एकाएकी नाराज का झालात ? "

नाराजी नाही तर काय !

बल्याला येऊन अशी बदसूरत पाहण म्हणजे अपशकून होता ! असे विद्रूप चेहरे पाहण्याची आडगावच्या चौधऱ्याना सवय नव्हती ! नवाबसाहेबानी अशा 'बेशकल्' स्त्रीवर लट्टू होऊन जाव, म्हणजे नवलच ! आडगावच्या पोरी नवाबसाहेबानी पाहिल्याच नव्हत्यान् काय ! त्या बेफाम सुदर ! तशाच बेछूट आणि मस्त ! खर म्हणजे 'दहकानी जवानी'चा नवाबसाहेबाना स्पर्शच झाला नव्हता ! त्यामुळ तिच कितीही आणि कसही वर्णन केल, तरी काय उपयोग होता ?

उभ्या उभ्याच नवाबसाहेबानी आडगावची पोरगी हवी असल्याची लपट भाषा केली वाटेल तेवढा पैसा ओतायची त्याची तयारी होती, आणि आडगावचे चोधरी तरी त्याचे जिगरदोस्तच नव्हते काय ? लगेच खरेदीच्या शब्दाना अवसर लाभला

मग 'माल' दाखविण्यासाठी आणि सौदा करण्यासाठी नानाजी चौधऱ्यान उबरग्याच्या नवाबाला आडगावी आपल्या 'वरवाड्या'त आणल.

आगत स्वागत आणि उपाहारादि प्रकार आटोपल्यावर धनिणीच्या वेशात सहज एकदा अतर्गृहातून बाहेर आलेल्या स्त्रीकड नानाजीनी नवाबसाहेबाना इषारा करून पाहायला लावल.

ती सुरेख आणि सुडौल आकृति जशी वेगान नजरेच्या कक्षेत आली तशीच आणि तेवढ्याच वेगान नजरेपार गेली.

प्रेयसीच्या नजरेसाठी प्रियकर नजर गमावून बसला ? की प्रेयसी दृष्टिआड झाली तेव्हांच प्रियकराला दृष्टिलाभ झाला ?

ते स्वप्नातल चादण प्रत्यक्षात पाहण्यासाठी नवाबसाहेब हुळहुळ झाले !

सौदा ठरला !

पण आडगाव हे लुच्याच गाव असल्याची वाईट ख्याती नवाबसाहेबाच्या आजोबापासून ठाऊक होती. 'माला'ची रक्कम गावाची शीव ओलाडल्यावरच दिली जाईल असा करार झाला !

कोणत्याच अटीला चौधऱ्याचा इन्कार नव्हता !

मग ठरलेल्या दिवशी पडद्याचा मेणा आडगावाबाहेर पडला मखमली आणि गोंडेदार छताच्या छकड्यात लोडाला टेकून बसलेल्या नवाबाच्या शेजारी नानाजी बसले आणि ती लहानशी मिरवणूक धोपट रस्त्याला लागली

नेमलेल्या स्थळी सौद्याची रक्कम द्यायला आणि घ्यायलाही आरभ होतो न होतो तोच एका सशस्त्र लुटारू टोळीचा गराडा पडला. चौधरीच्या रक्षकाची शस्त्र टोळीवाल्यानी छिनून घेतली आणि रकमेची थैली हस्तगत केली. टोळीच्या नायकान नानाजी चौधऱ्याला छकड्याखाली खेचल. काय बदमाष होता नानाजी चौधरी ! आडगावची अश्राप पोरगी कुठल्याशा नवाबाला विकीत होता नाही का ? नानाजीला मेण्याशी बाधून टाकण्यात आल नवाबसाहेबाच्या नावगावाची खडसून चौकशी झाली. बदुकीच्या नळीशी छाती भिडविल्यावर खोट बोलायची छाती होण अशक्य होत !

नवाबसाहेबानी सगळ खर खर सागितल ! दिसण्यात धिप्पाड असलेला टोळीचा म्होरक्या चळचळ कापत असलेल्या नवाबसाहेबाना म्हणाला, "तुमच्यासारख्या खानदानी माणसान अशा भानगडीत पडण योग्य नाही परन्तु यात तुमचा तरी काय कुसूर ! ही सगळी हरामखोरी या नानाजी चौधऱ्याची ! आम्ही याला आता गोळी घालणार आहो ! जान प्यारी असेल तर पळता येईल तेवढ्या जोरान पळा ! पुन्हा मात्र आडगांवच्या पोरीच्या नादी लागू नका ! "

लाख गमावले तरी जान बचावल्यामुळे लाखाची कमाई झाली अस समाधान वागवीत उबरग्याचे नवाब सही सलामत आपल्या माणसात आले !

' बहोत अच्छा हिरामण ! '

नानाजी चौधऱ्यानी टोळीच्या म्होरक्याला–हिरामण रामोशाला–शाबासकी दिली.

हिरामणन चटकन् त्याना बधमुक्त केल आणि त्याच्या पायावर मस्तक ठेवल.

रकमेच्या थैलीसह तो सर्व लवाजमा आडगावच्या वरवाड्यावर येऊन दाखल झाला.

शकील जगाच्या नावान लगेच फैमायशीच्या सदर्भात आडगावाहून उत्तर रवाना झालं.

आडगावची मालगुजारी हुजुराच्या सेवेत दाखल [illegible] येथून वेळेवर रवाना झाली.

आमच्या बद्किसमतीन वीस पचवीस कोसावर रकमेची 'गुमनाम' लुटारूकडून बेरहमीन लूट झाली ! आणि दोन महिन्यानतर जखमी झालेला फक्त एकच इसम ती बातमी घेऊन परत आला आता घरातील सर्व 'चीजवस्त' (याने जेवर) विकून चागला इतेजाम करून रक्कम पाठविली आहे. 'ताकीर' (उशीर)ची माफी असावी.... "

एकदा म्हणे अस झाल की, आडगावच्या एका सोनाराची पोरगी पाच सहा मैलांवर असलेल्या 'धारपिपरी'च्या देशमुखान पळविली !

यात्रेतली भेट ! गर्दीतला हवाहवासा वाटणारा कोपराचा धक्का. त्या धक्क्यातून फुटलेल्या विजाचे फटकारे ! डोळयानी घेतलेला मनाचा तळ ! मागोवा ! जवळीक मिळविण्याची आतुरता !

अनुरागाच्या अग्निशिखेवर आपली अन्तःकरण टेकून ती पांखर थाबली !

हात धरल्यावर बोलाचाली झाली. मनोगताची सर्वच सूत्र शब्दानी स्पष्ट झाल्यावर ती जुळती ठरली आणि मग गुफली गेली

आडगावच्या सुवर्णकाराची पोरगी म्हणजे मुशीत ओतून काढलेली मुसमुस होती! आडगावच्या पाण्यावर पोसलेली ज्वानी तिच्या अगरगात नुसती नळनळत होती!

धारपिपरीचा देशमुख लपून छपून आडगावच्या वस्तीला रात्री मुक्कामाला येऊ लागला. प्रेयसीच्या प्रतीक्षेतील औत्सुक्याच चादण त्याच्या वाटेवर साडू लागल आणि रात्रभर तिच्या जागलेल्या आणि जागविलेल्या डोळ्यातली लाली आभाळात फुलली की तो निघून जाऊ लागला!

आडगावच्या पाणदीतले व्होले सध्याकाळीच खुसफुसू लागत आड-रानातील झोपाळ झाडाच्या सावल्या गर्द होऊन एकमेकात घट्ट मिसळून जात. आडगावातली देवळं रात्री खूप उशिरा रिकामी होत. जवळचे बाजारहाट बहरून जात! आणि मग आडगावाच्या सार्वजनिक विहिरीत एका निद्राजड नेत्राच्या किशोरीचा पोहरा पुन पुन्हा पडत राही आणि बुडू लागे!

राघून चोच मारलेल्या फळाला येणाऱ्या माधुरीसारखाच हा सगळा प्रकार मधुर वाटू लागला!

मग बातमी फुटली.

"सोनाराची पोरगी धारपिपरीच्या देशमुखाचा हात धरून गेली!"

मग निराळ्याच शब्दात ती बातमी प्रकट केली जाऊ लागली,

"देशमुखान सोनाराची पोरगी पळविली!"

ज्या दिवशी ही भानगड उजेडात आली आणि उजेड झाला तोच धारपिपरीची प्रौढ समजदार मडळी देशमुखाच्या वाड्यात आली. आड-गावच्या चौधऱ्याला गाव जाणून होतच देशमुखाच्या अशा वर्तनान गावावर नसत सकट येणार हे आता नक्की झाल होतं, आता सरळ आडगावाला जाऊन चौधऱ्याची क्षमा मागावी आणि सोनाराची पोरगी सन्मानान परत करावी, हेच हिताच होत!

देशमुखाच तरुण रक्त विरोधांना जुमानण्याइतक पातळ नव्हत !

त्यान सागितल, " मला चौधऱ्याच मुळीच भय वाटत नाही ! पण गावावर काही सकट आलच तर मी आपणहून चौधऱ्याच्या स्वाधीन होईन ! "

अजाण हट्टाच्या ताठरपणापुढ अनुभवाची जाणीव काहीच करू शकली नाही !

माणस आली तशी परत गेली !

देशमुखान हलकेच आपल्या प्रेयसीकड पाहिल ! लाजून तिन खाली पाहिल आणि पायाच्या अगठ्यान ती जमीन उकरू लागली नखान सकट उडविण्याचं सामर्थ्य तिच्यात होत हे नक्की !

' वरवाड्या' तल्या भरलेल्या बैठकीत ही बातमी चाचरत आणि दबकत निघाली लोडाला टेकून बसलेल्या आणि जवळच्या एका माणसान करून दिलेल पान चावायला आरभ केलेल्या राजाजी चौधऱ्यानी गर्जून विचारल, " काऽय ? हे खर ? "

त्याचा करडा आवाज साध सभाषण झाल तरी महारवाड्यातल्या शेवटल्या खोपटापर्यंत जाऊन पोचत असे

या अनिष्ट आणि अप्रिय वार्तेन आता तर तो चागलाच तापून निघाला होता !

तो ऐकताच मोकळेपणान बसलेली बैठकीतली माणस भेदरली आणि सावरून बसली खालच्या घरात पाळण्यात झोपलेली काही तान्ही मुलं एकदम दचकून किचाळत उठली वरवाड्यातल्या पाणक्याच्या हातचा पोहरा एकदम सुटला आणि विहिरीत पडला. चौकातल्या आडावर पाणी भरीत असलेल्या कुलागना घराकड धावून मुलाना छातीशी धरून त्याचे कान फुकू लागल्या ! आडगावचे चौधरी आजच काय खलास झाले होते ? त्याच्या परवानगीवाचून सोनाराच्या पोरीन गाव कस सोडलं होत ? धारपिपरीचा देशमुख असा चढेल केव्हापासून झाला होता ? मुलीचे पालक काय करीत होते ? अस काही अयोग्य व्हाव, हा राजाजी चौधऱ्याच्या अस्तित्वाला केवढा तडाखा होता ?

अंगांत एकाद्या विचित्र अनावर शक्तीचा सचार व्हावा त्याप्रमाणें ते तडफडून एकदम उठले दारात उभ राहून त्यानी रामोशाला हाक मारली, " काश्या ऽ ऽ ऽ—–"

थोरामोठ्याच्या तोंडातून ' काशीनाथ ' असं सबोधन रामोश्याला उद्देशून निघेल हे अशक्यच होत ' काश्या ऽ ' असा कर्णकठोर उच्चार ताणताना 'शा'तून निघालेले 'आ' काराचे प्रतिध्वनि भेदरून स्तब्ध झालेल्या वातावरणाला नुसते झडपीत गेले!

वरवाड्यातल वातावरण फार गरम झाल्याची ती खूण होती !

काश्यानं शिळ्या भाकरीचा पहिलाच घास दातात रगडायला आरंभ केला होता लगेच त्यान पाण्याचा घुटका घेऊन तो तुकडा गिळला. आणि मुडास सावरीत तो धावतच आला.

चौधऱ्यानी मुलीच्या आईवडिलांना बोलावून घेतलं. खरं काय आहे याची चौकशी केली वेळीच ही वार्ता का कळविली नाही म्हणून धमकावल !

असा काही प्रकार होईल याची आईवडिलाना काही कल्पना नव्हती. आणि तस काही असत तर चौधऱ्यासारख्या गावाच्या रक्षकाला त्यानी कळविल नसत का ?

झाली ही चूक मोठी होती !

क्षमायाचनेसाठी त्या जोडप्यान हात जोडले होते. मुलगी कुठंही असली तरी सुखात रहावी अशीच इच्छा त्यांनी बोलून दाखविली !

चौधऱ्यांनी त्या सुवर्णकाराकडे एक डोळा आकुचित करून पाहिल.

त्यांचा पाहण्यातला अभिप्राय कुणालाच कळून येण्यासारखा नव्हता !

सकाळी तें सोनाराच जोडप गावाला वळसा घालणाऱ्या ओढ्यात मरून पडलेलं आढळल.

काश्याचे डोळे त्या दिवशी अधिकच लाल दिसत होते !

त्या जोडप्यान आत्महत्या केली होती की त्याचा खून झाला होता काही कळत नव्हत. कुठ काही कुजबुज करतां येत नव्हती. कुठ कुणा-

जवळ सहानुभाव प्रकट करता येत नव्हता. किंवा कुणी अधिक चौकशीच्या भानगडीत पडेल हेहि अशक्यच होत !

मग एकारात्री जेवण वेळ टळल्यावर धारपिंपरीच्या देशमुखाच्या वाड्यापुढ तोड्याच्या बदुकीचा एकदम दण्ऽ असा बार झाल। !

किंकाळी फोडण्याइतकीही भयाला सावधानता राहिली नाही. अधार आणि अडोसा करून ते चळचळ कांपू लागल. ' चौधरी आला ' हीच कुजबुज भितीभितीतून फुटली. आणि लगेच दाराचे अडसर सरकले !

खरच चौधरी आले होते !

काश्या रामोश्यान बदुकीचा बार केला होता. चौधरी एका उमद्या घोडीवर स्वार होते घोडी फुरफुरत होती खुरानी जमीन उकरू पहात होती. चौधरी लगाम सावरून तिच्या सगरसिद्धीला जणू अडवीत होते ! मशाली ढणढणत होत्या आणि तीस पस्तीस सशस्त्र माणस आव्हानाच्या थाटांत सुसज्ज होती !

मग काही समजूतदार आणि वयस्क माणस हात जोडून सामोरी आली. देशमुखाकडून घडलेला अपराध अक्षम्य होता ! पण राजाजी चौधऱ्याच्या औदार्याला आवाहन करायला केवढा चागला अवसर लाभला होता !

चौधऱ्यानी ' अ ' आणि ' ह् ' चेच भरीव कठोर उच्चार होऊ शकतील अस हास्य केलं. ते त्याच्या जबड्याच्या भागातच दडवून ठेवल होत की काय न कळे ! मनाच्या कुठल्याच मृदु ओलसर भागाचा त्याला स्पर्श नसावा !

एकाद्या खल पुरुषाला शोभेल असं ते भयप्रद हास्य होत !

गांवकऱ्यानी लगेच घराघरातून होती नव्हती तेवढी सपत्ती चौधऱ्यांच्या जवळ आणून ठेवली. चौधऱ्यांनी रुकार दिला नाही किंवा इन्कारहि केला नाही ! क्षणभर तिकड पाहिलं न पाहिल्यासारख करून त्यांनी देशमुखाच्या दाराकडं नजर वळवून काश्या रामोशाला इशारा केला.

काश्या आणि त्याच्या जोडीदारानी देशमुखाला आणि त्याच्या प्रेयसीला ओढून बाहेर आणल आणि पूर्वीच सगळे बेत बात आखल्याप्रमाण त्याना परस्परासमोर काही अतरावर बाधून टाकल

तोच सोनाराच्या मुलीच्या अगाला आच लावली गेली. वस्त्र पेटल. मोठा भडका झाला. तिच जित ओल अग चट् चट् वाजत शिजून निघाल. आणि अखेर ती भाजून खाक झाली !

वेदना असह्य झाल्याचा बारीक चित्कार निघाला नाही दयेची याचना तर तिन मुळीच केली नाही !

तिच्या सहनशीलतेन चौधऱ्याच क्रौर्य आणि कठोरतेच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडाल्या की काय कोण जाणे !

अस होत आडगावच पाणी !

मग देशमुखाच्या पायाची पहिली चिधी पेटली चटके बसू लागताच तो ओरडू लागला.

कच्च मडक !

चौधऱ्यानी आपल ठराविक भयानक हास्य केल आणि म्हटल, " नादान ! आडगावची पोरगी पळवायला फार दम लागतो ! जोखलस का त्या पोरीच पाणी ? "

मग जळून खलास होईपर्यत देशमुखाच्या किकाळ्यानी ते गाव भरून गेल होत !

पायाशी आलेली रक्कम चौधऱ्यानी जळून खाक झालेल्या सोनाराच्या पोरीच्या सागाड्या पुढे ठेवली मग अधारात तोड घेऊन उपरण्यान डोळ्याच्या कडा त्यानी उगीच पुसल्यासारख्या केल्या आणि काश्याला पुढ घालून ते ' वरवाड्या 'वर आले !

बाळाजी चौधरी आपली पोरगी बाजीराव देसायाच्या थोरल्या मुलाला द्यावयाचा मनसुबा करून होता. पोरगा दिसण्यात उमदा आणि

उमेद वाढवील असाच होता. शिवाय झाडगावच्या आसपासच्या तीन चार वाड्या धरून देसायाना पधरा हजाराची अमदानी होती. ठिकाण चटकन् नजरेत भरण्यासारख होत !

काही वजनदार नातेवाइकाकडून चौधऱ्यांनी निरोप करून पाहिले. ते देसायानी कानावर घेऊन कानाआड केले की आणखी काही झाल कुणाला माहीत ! काहीच जबाब आला नाही !

आपल्या झुपकेबाज मिशावर चौधऱ्यानी अगठा आणि तर्जनी फिरविली आणि स्वत लाच ऐकू येईल असा दीर्घ हुकार टाकला.

एके दिवशी ते स्वत च देसायाच्या झाडगावी गेले.

किंचित् अधू दृष्टीच्या थोरल्या देसायांनी प्रश्न केला.

" कोण ? "

" मी बाळाजी चौधरी आडगांवकर ! "

मुलीच्या बापाची सगळी लीनता आणि शालीनता अगी आणून चौधऱ्यानी उत्तर केल,

" ओ ! हो ! हा ! याव यावं ! "

अस स्वागत करून देसायांनी त्याना हाताला धरून आपल्या शेजारीच बसवल. कुशलाची पूसतपास झाल्यावर मधल्या घराकड तोड करून देसायानी फर्मावलं,

" अहो ! आडगावकर चौधरी आले आहेत ! उपाहाराच लवकर तयार करा ! "

इतक्यात रुईफुलाचे रेशमी कांठ असलेल धोतर नेसलेला तेज पुज, गौरवर्णी, डोक्यावर सजाब असलेला आणि गळ्यातली सुवर्णाची कठी सावरण्याचा चाळा करणारा एक तरुण मुलगा बैठकीत कपडे घालण्यासाठी आला.

त्याची स्नानसध्या नुकतीच आटोपली असावी थोरल्या देसायांनी त्याच्या ऐटबाज चालीचा अभिमान अतर्यामी साठवीत म्हटलं,

" कांतराव ! हे आडगांवकर चौधरी ! नमस्कार करा याना ! "

कातरावांनी नम्रतेन चौधऱ्याना वदन केल. चौधरी कातरावाकडं नुसते पाहतच राहिले !

देसाई आतिथ्यशीलतेत फार नामांकित होते, चौधऱ्याचा मुक्काम आठ दहा दिवस त्याच्याकड होता, तरी त्याना ते जाण्याची भाषा मुळीच काढू देत नव्हते !

"राहा हो ! आधीच तुम्ही दुर्लभ तशात आलात काय आणि लगेच जातो म्हणता काय ! आमच्या येथल जेवण आवडत नाही की काय ?"

"वा ! वा ! अस कस म्हणता ?"

"मग राहाच !"

"मी तर आपण कायमच पदरात ध्याव म्हणून तर आलो आहे!"

चौधऱ्यानी सूतोऽवाच केल आणि मग मनोगत उघड करून सांगितल.

थोरले देसाई विचित्र तऱ्हेन हसले. ते हसले की त्यानी उपहास व्यक्त केला काहीच कळल नाही.

जरा विचार केल्यासारखा करून बाजीरावानी चौधऱ्याचा हात धरला आणि त्याना एका प्रशस्त लादणीत नेल. तिथ पडलेले भरलेल्या थैल्याचे वेगवेगळे ढीग आणि त्यावर ठेवलेल्या चिठ्ठ्या त्याना वाचून दाखविल्या.

दाभाडकर देशमुखाचे वीस हजार पडले होते ! राजणगावच्या आबासाहेब लाख्याचे तीस हजार आले होते ! आणि सर्वात वरचा आकडा चाळीस हजाराचा होता ! हा आगाऊ आलेला हुंडा कसा परत करावा याचा खोल विचार करूनहि थोरल्या देसायाना मार्ग सुचत नव्हता ! बाळाजीची छाती फुटून गेली नाही, हेच नवल होत !

"वा ! वा !" असे प्रशंसोद्गार काढीत त्या कुमट लादणीबाहेर चौधरी आले आणि मग मात्र त्याच्या जाण्याच्या घाईला थोरल्या देसायांनी अडथळा केला नाही !

चौधरी खालच्या पायरीवर उतरले तोच त्यांना देसायांचं मुक्त हास्य ऐकू आल !

काय बदमाष थेरडा आहे, अस स्वतशीच म्हणत चौधऱ्यानी रिकिबीत पाय घातला आणि घोड्याला टाच मारली!

आता चौधऱ्यानी काही बोलायच तर चाळीस हजारावरच बोलावं, अन् विशेष म्हणजे रकम आगाऊ आणून दाखल करावी! चाळीस हजार काय, चाळीस कवड्याहि द्यावयाच्या लायकीच देसायाच घराण नव्हत! घोड्याच्या गतीबरोबर चौधऱ्याचे विचार चौखूर धावत होते

घरच्या मडळीनी रात्री भोजनोत्तर पाय दाबताना चौकशी केली तेव्हा चौधऱ्यानी शातपणान म्हटल, " जुळेल! जुळेल! "

आणि मग त्यानी आपली मान अशा झोकान हालविली की जणू त्याना म्हणायच होत, " पाहून घेईन! "

'वेळ सागून येत नाही' अस म्हणतात ते कोणत्या अर्थान, हे बाळाजींना समजल नाही, त्याना हवी असलेली वेळ मात्र सागूनच आली होती!

एकदा 'रामदेवळी'चे दडके चौधऱ्याकड आले. दडक्याच न् देसायाच कालातरातून चालत आलेऊ हाडवैर चौधऱ्याना ठाऊक होत.

'मी आल्ये!' अस आता वेळेन सागायला पाहिजे होत काय?

खोकल्या पडशान चौधऱ्याचा चेहरा हुबरून लालबुद पडलेला पाहून दडक्यांनी विचारल, " तब्यत बरी दिसत नाही! "

" ह! थोडीशी! पाणी बदलल्यामुळ व्हायचच अस! "

" का? कुठल्या दौऱ्यावर गेली होती स्वारी? "

" झाडगावच्या देसायाकड! "

" अस्सं! काही विशेष? "

" तस काही नाही. पण पाहू नये ते पाहिलं आणि ऐकू नये तें ऐकल! "

" म्हणजे? "

" तुमची नव्यान बदनामी ऐकायला मिळाली! "

अस म्हणून चौधऱ्यानी हास्य केल.

पेटाऱ्यातल्या नागाला पहिली टिचकी मारताच तो जागा होऊन फणी उभारतो की नाही हे पाहणाऱ्या जादुगाराच्या शोधक नजरेन चौधऱ्यानी दडक्याकड पाहिल.

दडक्यांची अहृता भरपूर डिवचली गेली होती! दडके रागानं म्हणाले,

"तो हरामखोर थेरडा अद्याप शिव्या देतच असतो नाही का आम्हाला ? "

"शिव्याबरोबर शाप देखील ! "

"अस ! अस ! ते काही नाही चौधरी, या देसायाला एकदां चांगलाच हात दाखविला पाहिजे ! पण तुमची मदत पाहिजे ! "

"तुमच्याकडून हेच ऐकण्यासाठी मी उत्सुक होतो ! हवी ती मदत करायला मी एका पायावर तयार आहे ! "

त्याच बैठकीत हातात हात जुळवून एकमेकाना मदत करण्याची वचन, अभिवचन आणि आश्वासन बळकट झाली !

शिवरूप नावाच्या रामोश्याला चौधऱ्यानी बोलावून घेतल आणि जवळपास कोणी नाही असे पाहून हलकेच ते त्याला म्हणाले,

" लवकरच आपल्याला निघाव लागेल ! तयारी ठेव ! "

निघण्याची तयारी शिव्याला ठाऊक होती. " जी हो ! "असा रुकार देऊन तो तयारीला लागला !

देसायाच्या घरावर डाका घालण्यासाठी चौधरी, दडके आणि मडळी निघाली. हल्ला कुणी करायचा, प्रतिकार झाला तर कसा थोपवायचा, लूट कोणत्या मार्गान कुठ न्यावयाची या गोष्टीची चर्चा झाली.लूट दडक्यानी न्यावी आणि मग प्राप्तीचा अर्धा वाटा चौधऱ्याना द्यावा, काही प्रतिकार झालाच तर चौधऱ्यानी तो मोडून टाकावा, अस ठरल. देसायानी पैसा कुठ ठेवला आहे वगैरे सगळ चौधऱ्यानी सागितल !

ठरल्याप्रमाण हल्ला झाला. पण काही घटकापूर्वीच कुठल्याशा लुटारू टोळीन देसायाच घर धुवून नेल होत मारहाणीखेरीज दडक्याना काहीच करता आल नाही आणि कसलाच लभ्याश झाला नाही.

चौधऱ्यानी ठरलेल ठिकाण सोडून दडक्याच्या टोळीवर फार मोठा जमाव चालून येत असल्याचा देखावा केला. दडक्यानी पळ काढला आणि चौधरी देसायाच्या देवडीवर घुसले ते डाकू म्हणून नव्हे तर देसायाचे रक्षक!

घाबरून थरथरत असलेल्या देसायाला ते म्हणाले, " घाबरू नका देसाई! मी आलो आहे! सहज गावी परत जात असताना मला झाडगावाच्या शिवेवर काही सशयास्पद आढळल म्हणून इकड वळलो ! "

मग त्यानी नीट चौकशी केली. दरोडेखोराना शिव्या दिल्या.त्याचा पत्ता लावीन असा निश्चय केला आणि देसायाना दिलासा दिला देसाई मात्र आता पूर्ण कफल्लक झाले होते ! आणि चौधऱ्याच्या गळ्याला पडून त्यांनी मोठा हुदका दिला होता.

प्राप्तीच्या अर्ध्या वाटच्यासाठी घरी येताच चौधऱ्यानी दडक्याना निरोप केला. ' लूट मिळाली नाही, तेव्हा मी आपणाला काय देऊ ? ' अस रडक उत्तर दडक्यानी पाठविल. प्रत्यक्ष भेटीत शपथा खाल्ल्या. मारोतीचा शेंदूर काढतो अस म्हटल

पण चौधऱ्याशी गाठ होती ! अशा बनवाबनवीन चौधरी फसणार नव्हते. लूट निश्चित मिळाली होती न् त्यातला अर्धा वाटा ठरल्याप्रमाणं चौधऱ्याना मिळण आवश्यक होत ! दडक्यानी कदाचित् ती खर्च केली असेल तर हप्त्या हप्त्यान घ्यायची सवलत चौधरी द्यायला तयार होते अन् अशा तऱ्हेन दडक्याच्या बोडक्यावर न झालेल्या लुटीचा वाटा चौधऱ्यांनी ठेवून दिला होता !

काही दिवसानी चौधऱ्यांनी देसायाकड निरोप केला,

" आगाऊ हुडा किती पाठवायचा ? "

देसाई आपणहून आडगावला आले, आणि चौधऱ्याच्या पोटांत मान घालून म्हणाले,

" मी सपूर्ण नागवलो गेलो आहे मला लाजवू नका! व्याही म्हणून आता तुम्हीच मला पदरात घ्या ! "

खर म्हणजे चौधऱ्यानीच देसायाला नागवून त्याची सगळी लूट आपल्या घरी आणली होती. आणि आपली मुलगी त्याच्या मुलाला देऊन सोयीरसंबध जोडला होता !

बिचारा दडके चौधऱ्याचे हप्ते भरता भरता भिकेला लागायला आला होता !

आबाजी चौधऱ्याचा जमाना होता ! आडगावच्या आडाना नवे झरे लागले होते. आडगावच्या मळ्यातली फळ रसरसून निघाली होती. आडगांवच्या श्रमसौदर्यावर आडगावची काळी सुप्रसन्न होती. आडगांवची गुर माजून मस्तीन डरकाळ्या फोडीत होती आणि माणसाचं दास्य सुखावह असल्याच सूचित करीत होती सौख्य आणि सपत्तीन आडगावातल घरन् घर भरलेल दिसत होतं.

चौधऱ्यानी मागितलेली रकम द्यावयाला गावकरी मुळीच नाराज होत नव्हते त्याच्या अस्तित्वानच सौख्य, तुष्टि, वैपुल्य शिगेला येत होतं अशी श्रद्धा होती !

चौधऱ्याची आग तेवढ्यावरहि निवत नव्हती की काय कोण जाणे !

आबाजी चौधऱ्याना एका रात्री साक्षात्कार झाला ! गावातल्या महादेवाच्या पडक्या उपेक्षित मदिराचा जीर्णोद्धार करण्याचा आदेश त्याना मिळाला !

वरवाड्यावरल्या बैठकीत ही कल्पना बोलून दाखविताच गावभर तिच स्वागत झाल. फर्द्या तयार झाल्या. आकडे पडले. आणि 'हस्ते परहस्ते' साठी फर्द्यासह गावोगाव दूत निघाले

डाकू चौधऱ्याचा दुर्लौकिक गाणारी आणि प्रसृत करणारी माणसं म्हणू लागली,

" धन्य चौधरी ! धन्य धन्य आबाजी आडगावकर ! अशा चागल्या कामाला कोण पैसा देणार नाही ? ......"

वरवाड्यावर वर्गणीच्या रकमेचा ढीग वाढू लागला पचमंडळीना आबाजीनी बोलावून म्हटलं,

" हें महादेवाच धन तुमच्याच सांभाळी असू द्या !"

पंचातले प्रमुख म्हणाले,

' वा ! वा ! अस कस ? सत्कार्यार्थ जमलेली रक्कम सज्जनाच्याच घरी सुरक्षित राहणार ! "

आबाजी चौधऱ्यानी डोळे झाकले. आतल्या आवाजाचा त्यानीं कानोसा घेतला. आणि योगियाच्या गाभीर्यानं म्हटल,

" ठीक आहे ! शंभूची अशीच इच्छा असेल ! "

मदिराच्या पुनर्रचनेला जोरात आरभ झाला. वेरूळचा घृष्णेश्वर, परळीचा वैजनाथ, औढयाचा नागनाथ लोक प्रतिवर्षी पाहात होते. आतां त्याना आडगावचा महादेव पाहायला मिळणार होता ! तशाच पद्धतीची बाधणी, तेवढच प्रशस्त आवार, परगावच्या प्रवाशाना उतरायला ओवऱ्या आणि भली विशाल आणि खोल बारव, अशी योजना होती दूरदूरचे कसबी लोक आणून ती साकार करण्यात येऊ लागली.

श्रद्धेची गाढता घेऊन घडविलेल्या प्रस्तराचे थर परस्पराना चिकटून बसू लागले आणि त्या सबध वास्तूला भावनेन कमालीच सुदर आणि सुरम्य करून टाकल !

मदिर तयार झाल !

प्राणप्रतिष्ठेचा दिवस नक्की झाला. माघ वद्य चतुर्दशीला आडगावाच्या महादेवाची फार मोठी यात्रा जमली ! भारी पीतांबर नेसून आणि सगळी शुचिर्भूतपणाची अगावर चिन्ह धारण करून आबाजी वरवाडयातून अभिषेकासाठी निघाले. मग मत्रघोषान मदिर भरून निघालं. अभिषेक सपल्यावर आबाजीनी महादेवापुढ मस्तक टेकविल. आणि मनोमन काही मागण मागितल. मग दर्शनाला मार्ग मोकळा झाला. सोन्याचा मुखवटा घातलेल्या शाळुकेपुढ मुद्राच्या राशीवर राशी पडल्या. त्या एवढया की त्याच्या समानतेला बिल्वदळहि कमीच भरली असती !

जेवणाच्या पक्तीवर पक्ती उठल्या. विप्रवर्ग आपापसात दक्षिणेची चर्चा करू लागला. त्याच्या पितामहाच्या हयातीपासून एवढी अमाप दक्षिणा देणाऱ्या यजमानाच नावच ठाऊक नव्हत !

सोवळयाओवळयाचा काही भ्रष्टाकार होऊन महादेव कोपला कीं काय कोण जाणे !

रात्री अकस्मात् सोन्याचा मुखवटा नाहीसा झाला. आबाजी चौधरी दिवसभराचे श्रम घेऊन किंचित् आडवे झाले होते. ही अप्रिय वार्ता कानीं येतांच ते तसेच उघडेबोडके बाहेर पडले. त्यानी गुरवाला आणि पुजा-

न्याला लाख शिव्या मोजल्या. आपल्या आवडत्या देवभान नावाच्या रामोशाला निवडक माणस घेऊन गावाबाहेरच्या सगळ्या वाटा रोखायला सागितल्या. आणि यात्रिकाच्या प्रचड जमावापुढ येऊन एका उच चौथऱ्यावर उभ राहून ते म्हणाले,

" अनेक प्रयत्नानी चौधऱ्याच्या मानवी नेत्राना मदिराचा अपेक्षित जीर्णोद्धार झालेला दिसला. तो आडगावच्या आणि जवळपासच्या श्रद्धाळू गावकऱ्याना पहायला मिळाला ही या युगातली केवढी भाग्यशाली घटना ! पण ह्याच अभग श्रद्धेच्या आणि प्रभावी भक्तीच्या युगात महादेवाचा मुखवटा चोरीला जावा ही केवढी घृणास्पद गोष्ट आहे. भावी पिढ्याना हे कळल तर तुम्ही आम्ही अत्यत सकलक ठरू ! हरकत नाही, त्या पिढ्याना होह कळल पाहिजे की सोन्याचा मुखवटा हरवला खरा पण लगेच भक्तिमान् यात्रेकरूपैकी एकान तो परतहि केला आणि तो पुन्हा देवावर ठेवलेला सर्वांनी पाहिला ! अज्ञान आणि अश्रद्धेन एकाद्यान मुखवटा चोरण्याची चूक केली असेल तर ती लगेच दुरुस्त करावी ! तो मागेल तेवढी रकम द्यावयाला मी तयार आहे ! "

चौधऱ्यानी सर्व समुदायावर सापेक्ष दृष्टिक्षेप केला.

सोन्याचा मुखवटा जमावातून परत आला नाही चौधरी तापले.

ते जिवत असेतोवर सोन्याचा मुखवटा कुणाला पचेल हे अशक्य होत ! काही का असेना रथ मिरविताना विनामुखवटचाचा महादेव पाहण्याची त्याची तयारी नव्हती. यात्रिकाच्या दानशौर्याला त्यानी आणखी एकदा आवाहन केल. ते अपेक्षेबाहेर यशस्वी ठरल आणि महादेवाचा रथ मिरविला तो सोन्याचा नवा मुखवटा घालूनच ! मग यात्रा ओसरू लागली !

दक्षिणेच ओझ वाहून थकलेला विप्रवर्ग अर्ध्या वाटेतून रडत परत आला. त्याची सगळी दक्षिणा हिरावली गेली होती. आडगावच्या शिवेबाहेर यात्रेकरूना लुटारूचा उपद्रव पोचत होता

चौधऱ्यानी कपाळावर हात मारून कष्टी चर्या केली या दुर्घटनेचं कारण तरी काय होत ?

कुठल्या एका माणसानं धाष्टर्य करून म्हटलं,

" महाराज, आडगावचे रामोशी यात्रा लुटताहेत ! "

" अशक्य ! अगदी अशक्य ! आमच्या वाडवडिलानी आडगांवात अशी प्रवृत्ति ठरूच दिली नाही ! "

" वर्तमान भिन्न आहे महोदय ! . . "

" अस असेल तर तुम्हा यासमोर मी रामोशाना गोळी घालीन ! "

त्या अपरिचित माणसानं चौधऱ्याची कसोटी पाहण्याच ठरविल असल्यास न कळे !

पधरावीस माणसानी एका रामोशाला धरून चौधऱ्यासमोर आणून उभं केल.

तो चौधऱ्याचा आवडता सेवक देवभान! चौधरी चरकले, पण ठासून म्हणाले,

" सज्जनहो ! तुम्हाला खात्री आहे या माणसान लूट केल्याची ? एकादा निर्दोष आणि निष्पाप माणूस अकारण बळी पडायला नको ! "

देवभानला फक्त प्रभूची सेवा माहीत होती. त्याला समयसूचकता कुठली असायला ! प्रसगाच गाभीर्यही त्याच्या मनावर हिमालयासारख जडून गेल असेल चौधऱ्यानी विचारणा करताच त्याला काहीच उत्तर करता आल नाही.

मग त्यानी तत्काळ बदूक मागविली माघार घ्यावी तर प्रतिष्ठेला बाध येत होता. न्यायप्रियतेच प्रदर्शन करावं तर एका इमानी सेवकाला कायमचं अतराव लागणार होत !

खाडकन् गोळी उडाली आणि देवभानन मान टाकली ! महादेवाच्या पूजेला लाल फुल कमी पडली असावी ! आता पूजेची पूर्तता झाली होती !

अश्रूनी चेहरा मळालेली, कुकू ओघळलेली, केस विस्कटलेली अशी देवभानची बायको चित्ताचा भेद करणाऱ्या दु:खाच विद्रूप लेवून मागल्या दारी आली.

ज्या खोलीत चोरीस गेलेला सोन्याचा मुखवटा सुरक्षित होता, देवापुढल्या रौप्य मुद्राची रास जतन केली होती, आणि यात्रेची लूट जिथ दड-

विली होती, त्याच खोलीतून कांही नाणी उचलून आबाजी चौधऱ्यांनी तिच्या पदरात घातली आणि स्वत ला आलेला जोराचा हुंदका मान खाली घालून प्रयत्नान दाबला!

आडगावची आबादानी इतर गावाना कित्येक दिवस सलवीत आणि भुलवीत होती! ठाणे गावच्या कोल्हाटणी वारीवर निघाव, तसा सर्व साजबाज घेऊन घुगरमाळाचे बैल जोडलेल्या पडद्याच्या छकड्यातून निघाल्या की, चाल आणि चेहरे ओळखणारे काही शौकीन विचारीत,

" कुठ ?"

" चौधऱ्याच आडगाव!"

" आडगाव पाहृचलय् का कधी ?"

" का ?"

" नाही म्हटल, आता निघून पोंचाल केव्हा तिथ ?"

" जेवण वेळीला!"

ऐकणारा हसून म्हणे,

" आडगावच्या अलीकडच चादणी निघाली नाही तर मला विचारा!"

म्हणणाराचा अभिप्राय आणि आशय असा होता की आता निघून आडगावला सकाळी पोचण्यापेक्षा आजची रात्र ताफ्यान त्याच्या गांवांत हजेरी द्यावी आणि मग चालू लागाव.

कोल्हाटणी सार काही जाणून होत्या.

रात्रभर नाचून घामाची घुगर गाळलीं तरी रेवड्या विकणाऱ्या एकाद्या [illegible] त्या गावांत कमाई होईल की नाही याची शकाच होती.

नाक मुरडून कोल्हाटीण म्हणे,

" रातोरात गेलंच पाहिजे तिथ!"

आतापर्यंत श्रोत्याची आणि प्रेक्षकाची भूमिका घेऊन थांबलेला त्या दर्दी इसमाचा जोडीदार म्हणे,

"अरे जाऊ दे! चौधऱ्याचा इंगा तिला कळलाच नाही अजून! पैशाचं गाठोडं बांधून घेईल, आणि शिवेवर आल्यावर येईल पुन्हा आपल्या-कडंच रडत......"

"चौधरी डाकू आहेत असं म्हणायचंय् तुला? थांब गेल्यावर आधी तुझं नांव सांगते मी!"

"मायगंगे!"

ते गांवकरी म्हणू लागत,

"असं कांही करू नकोस! पाया पडतो......"

मग त्या कोल्हाटणी खो खो हसू लागत आणि धांवत्या बैलांच्या खळाळणाऱ्या घुंगरमाळांच्या मंजुळ ध्वनिलहरींवर ते हास्य बराच वेळ तरंगून राहिल्यासारखं वाटे. बघे त्यांच्या छकड्यांचे उडते रंगीत पडदे पहात परतू लागत.

चौधऱ्यांच्या परंपरेत कांही बदल झाला असल्यास न कळे!

बाबाजी चौधऱ्याची आणि त्याच्या काळच्या आडगांवाची कोल्हा-टणींना मुळींच भीति वाटत नव्हती. उलट दुसऱ्या एकाद्या गांवी जलसा उभा राहिला आणि तेथल्या प्रेक्षकांत एकादा तरी आडगांवकर आहे असं कळल्यास लावणींतलं लवण वाढे, नाचाची फिरकी जोसानं भरून जाई आणि डोळ्यांच्या मोडींनं रात्रीला रंग चढे!

त्या रात्रीं चौधऱ्याच्या वरवाड्यापुढं चांगली रोषणाई झाली होती. पांढऱ्या चादरींची न् लोडांची बैठक भरली होती. वरवाड्याच्या खिडक्यां-तून चौधऱ्यांचं कलत्र आणि इतर स्त्रीसमाज बसलेला दिसत होता. नाचरंगासारखे समारंभ चौधरी आपल्या स्त्रियांनाहि दाखवीत. तक्क्या-लोडांच्या बैठकीला टेकून खूप मोठा समाज जमला होता. डफ तुण तुण्याच्या साथीवर कोल्हाटणी गात होत्या आणि झोकांत नाचत होत्या. लोडाच्या नरमाईंत चौधरी आपलं अंग रुतवीत होते. एकाद्या आघातानं

सापाचे मणके ढिले व्हावे त्याप्रमाण कोल्हाटणीच्या अगमोडीन त्यांचा विवेक विरल होत होता. प्रवाही द्रव झिरपून गेल्यावर उरलेल्या जड गाळाप्रमाण त्याच्या डोळ्यात वासना भरून आणि रगून थाबली होती. नर्तिकेच्या हावभावान ती क्षणाक्षणाला वाढत होती ! एकाद रसदार फळ सालपटासगट कुरतडून चावून खाण्याची इच्छा व्हावी तशी, त्या नर्तिकेला तसच उचलून तिच्याशी मनसोक्त आणि उच्छृखलपणान एकात करावा ही इच्छा त्यांना दाबता येत नव्हती ! तिच्या मुरक्यासरशी बाबाजीचा डोळा आकुचन पावत होता आणि खाद्याला हिसका बसत होता ! नाचाचा रग मग अगदी गाढा झाला !

गावातल्या काही जागरूक कानाना कसली तरी भयकारक चाहूल लागल्याचा भास झाला. कुत्री भुकू लागली. जलशाला आसपासच्या गावातली माणस येत असावी अस वाटल झोपेच्या पहिल्या अमलातली काही तरणी नाजूक अग मिठी पडल्याच्या भासात उगीच चाळविली गेली. आणि मग कुशी बदलल्यावर शेज रिकामीच आहे अस आढळून आल्यावर पुन्हा हिरमुसून आणि मुरमुसून पडली

इतक्यात एकच हलकल्लोळ उडाला !

घराना आगी लागल्या. लूटमार होऊ लागली वरवाड्याच मागल दार फोडण्याचा प्रयत्न होऊ लागला.

जलसा मोडला. दिवे फोडले गेले जिथ क्षणापूर्वी बहारीच्या लावण्या चालू होत्या तिथ भयसूचक आरडाओरड उठली. जिथ विलासाचा रग भरला होता त्या पाढऱ्या चादरीवर उभ्या कापलेल्या मानातल रक्त ठिबकू लागल. क्षणापूर्वी डफाच्या थापेन जे वातावरण भरून गेल होत तिथ आता बदुकीचे बार निनादू लागले !

गावाची निर्दय कत्तल चालली होती आणि भरल्या हातान लूट होत होती !

कोल्हाटणीनी धावून चौधऱ्याच्या गळ्याला मिठी मारली. चौधऱ्यांनी एकदम हिसडा दिला आणि ती मिठी सोडवली. 'भावधन' नावाच्या

रामोशान रक्षणार्थ त्याना अधारात ओढल तिकड गाव जळत होतं. माणस घायाळ होऊन चीत्कार काढीत होती !

" चौधरी ! चौधरी ! वाचवा ! धावा ! "

रामदेवळीच्या दडक्याचे साथीदार ठोशाखेरीज बोलत नव्हते. धार पिपरीच्या देशमुखाच्या वशातले एक देशमुख आपल्या जोडीदाराना म्हणत होते,

" एक माणूस साबूत ठेवू नका ! एक घर सोडू नका ! "

आबाजी चौधऱ्याना वरवाड्यावरल्या आपल्या सपत्तीच अन् मुला-बाळाचं काय कराव अस कोड पडल होतं !

ते रामोशाला घेऊन वाड्यात धावले. सपत्ति वाड्यातल्या विहि-रीत टाकावी आणि बायकोमुलाला घेऊन चोरवाटेनं पसार व्हावं असं त्यानी ठरवल होत

सूऽ करीत आलेली एक गोळी आबाजी चौधऱ्याच्या छातींत घुसली. त्याचा पाढरा शुभ्र बंधाचा अगारखा छातीशी रगून निघाला. रामोशानं त्याना सावरल आणि एका चोरलादणीच्या दाराशी आणल

चौधरी म्हणाले,

" भावड्या ! माझा नाद सोड आता ! सोनाजीला पाळण्यातून उचल आणि कुठ तरी सुरक्षित स्थळी ने ! "

त्यानी कण्हत छातीला जखम झाली त्या भागाला हातान दाबून धरल. पतिराजाना शोधीत आलेल्या बाईसाहेबाच्या कडेच मूल भावड्यान ओढून घेतल. आणि 'चला' म्हणण्यासाठी बाईसाहेबाच्या हाताला त्यानं धरलं. आणखी एक बार झाला. आणि चौधऱ्याच्या सौभाग्यवती पति-राजाच्या अगावर पडल्या आणि विटबनेतून कायमच्या सुटल्या !

वरवाड्यातली लूट न्यायला दोन दिवस लागले होते. दोन रात्रीं गाव नुसत बेचिराख होत होत. पण दडके आणि देशमुखाचा द्वेष नुसता धुमसत होता आणि भडकत होता !

चौधऱ्याच कूळ नि सतान केल्याशिवाय दडके न् देशमुख गाव सोडायला तयार नव्हते. सोनाजी नावाचा चौधऱ्याचा पोरगा आणि भावड्या नांवाचा चौधऱ्याचा शरीररक्षकच असा रामोशी मात्र अद्याप आढळले नव्हते. विहिरीच्या कपारी, मातीचे ढिगारे, गवताची न् कडब्याची बुचाड आणि झाडाची पान वारून सारून पाहिली तरी ते आढळले नव्हते

रामोशाच घर निव्वळ नागरून निघाल. चौधऱ्याच्या वाड्याची पडझड झाली रस्ते रखतान माखले. माती हाडकानी फुलली वास्तु आक्रोशान भरले आडगावच्या चौधऱ्याच प्रेत गावाच्या मध्यभागी लटकल. आणि अखेर शस्त्रच थकली तेव्हा दरोडा ओसरला! ......

आडगावच पाणी न खडणार होत! आडगावाची माती कसाची होती! आडगावावरल आकाश निराळच होत! या शक्तीनी फुलविलेल आणि उभारलेल जीवन कुणीच नष्ट करू शकत नव्हत! गावाच्या या राखरागोळीला चौधरी आणि त्याचे पूर्वजच कारण झाले होते!

परतु आडगाव पुन्हा वसल!

आडगावच्या पाण्याचा उपसा झाला. माती पुन्हा नागरून नीट केली गेली. सोनाजी चौधऱ्याला वाजत गाजत आडगावच्या लोकानी वरवाड्यांत आणल. पुन्हा जीवन सुरू झाल. माघ वद्य चतुर्दशीला महादेवाची यात्रा भरली. नेहमीच्याच उत्साहान देवाचा रथ मिरविला जाऊ लागला!

आणि रामोशाच्या खोपटात, चौधऱ्याचा कुळदीपक भावड्या रामोशानं प्राणाचा अडोसा करून राखला असल्याच झगझगीत सत्य रामप्रहरी सुरू झालेल्या जात्याच्या घरघरीवर सुस्वरात गाइल जाऊ लागलं. ते आडगांवांत अनेक मुखी होऊन राहिलं! ......

● ● ●

त्या भागातली म्हातारी माणस सागत असत की, 'जामखेड रोड' नावाच्या स्टेशनवर नव्यानच आलेली आगगाडी पाहून आलेला आडगावचा एक माणूस अतिशय भ्याला जामखेड ते आडगाव, अस बारा मैल तो सारखा पळत परत आला. आणि घरी आल्यावर कित्येक दिवस आगगाडीच्या भयान त्यान आथरूण धरल.

थोडयाच दिवसानी जामखेड ते आडगाव अशी पक्की सडक झाली. त्या सडकेन दमणी जोरान पळवीत आडगावचे चौधरी गाडी गाठण्यासाठी जामखेडला जात, आणि कुठ प्रवास करून आडगावी परत येत

त्याच आडगावच्या लोकाना फार नवल वाटे! कारण आगगाडीत बसून ते जात येत असत जहागीरदारासारख्या मोठ्या माणसासाठीच ते भयकर वाहन असाव असा समज पुष्कळ दिवस कायम होता.

' आडगावकर चौधरी जहागीरदार ' असाच कागदोपत्री चौधऱ्याचा आता उल्लेख होत असे. आडगावची तीन हजाराची जहागीर बऱ्याच दिवसापासून चौधऱ्याच्या नावान चालू होती. ' पेरे पत्रक ' ' तीन निशाण ' ' कीर्दी ' ' खात ' अशी गावाच्या कारभाराची कागदपत्र कुलकर्ण्याकडून लिहिली जात होती, त्या प्रत्येक कागदावर काळ्या शाओत उठविलेली मोहर आढळे, ती जहागीरदाराच्या नावाची! सरकारी, नीम सरकारी किंवा खाजगी स्वरूपाचा पत्रव्यवहार होत असे तोहि त्याच नावान!

श्रीमत भाऊसाहेब चौधरी जरा कुठ जाऊन यावयाच झाल की, आगगाडीन जायच अस म्हणत होते. त्याच्या पायाला जणु भिंगरीच लागली होती! म्हाताऱ्याला आगगाडीत बसायची पोरकट हौस तर नव्हती? चारपाच दिवसाच्या वर एका ठिकाणी भाऊसाहेबाचा पाय टिकून राहात नसे. ते परत आले की, एकादा पायाळू, एकादा मान्त्रिक किंवा एकादा ज्योतिषी त्याच्या बरोबर असायचाच. चौधऱ्याचा ' वरवाडा ' अशा मडळीच्या मुक्कामाच एक हक्काच ठिकाण होऊन बसल होत !

या अनिच्छिताच्या आगमनान दुपारची आणि सध्याकाळची चूल धुसफुसत राही. पाकसिद्धीची भाडी नापसतीन खणखणत. कारण एकाद्या

मान्त्रिकाचा वाड्यात प्रवेश झाला की, तो आठदहा दिवस राहिल्याखेरीज हालेल हे शक्य नव्हत ! दोन वेळा यथेच्छ भोजन आणि भाऊसाहेबाच्या कडोसरीला असेल नसेल तेवढी सभावना उपटून मगच तो काढता पाय घेत असे !

चौधरी घराण्यातला कुणी एक महापुरुष अफाट सपत्ति बाळगून असता अनेकाचा द्वेषविषय झाला. आसपासच्या गावानी आडगावावर हल्ला केला. चौधऱ्याच्या सपत्तीची लूट, हा हल्लेखोराचा मुख्य हेतु होता. पण तो सफल झाला नसावा कारण त्या काळातला चौधरी घराण्यांतला एकेक पुरुष महान् शौर्यशाली होता ! सपत्तीची लूट होण अगदीच अशक्य कोटीतल वाटत होत. पण ती कुठ दडली होती. काही कळत नव्हतं !

ती वाड्यातल्या विहिरीत टाकण्यात आली होती, की कुठ पुरून ठेवली गेली होती, की त्या धनावर टपून बसलेले नात्याचा जिव्हाळा प्रकट करणारे नाग ते हातोहात घेऊन फरारी झाले होते, काहीच पत्ता नव्हता !

भाऊसाहेब चौधऱ्यानी एक वशवृक्ष तयार केला. 'दहा दिवसातले' 'तीन दिवसातले' आणि 'एका आघोळीन मोकळ करणारे' सगळे नातेवाईक त्यानी हुडकून काढले. त्या प्रत्येकाकड ते जाऊन राहून आले. ते सगळे कफल्लक आणि नागवे ! वरवाड्यातल्या संपत्तीचा तिथ थाग लागला नाही !

मग एके दिवशी वरवाड्यातल्या पडक्या भागात एक भला मोठा नाग निघालेला कुणीतरी पाहिला—त्याच्या अगावर लाब केस होते, आणि त्याचा उदासारखा वास येत होता !

धनावरले नाग असेच असतात, अस पाहणारान सागितल होत !

पूर्वजाच धन वाड्यातच होत याची आता भाऊसाहेबाना खात्री झाली होती !

वाड्यातल्या विहिरीचा कित्येक वेळा उपसा झाला. गाळ आणि गोट्याखेरीज विहिरीतून काहीच निघाल नाही. मग वाड्यातल्या पडक्या आणि उघड्या भागावर भर दिला गेला. सपाट जागेवर जागजागी मोठमोठे आणि खोल खड्डे झाले तरी कसलाच लाभ झाला नाही.

पायाळू, मात्रिक आणि [illegible] गुप्त धनाची नक्की जागा दिसण अथवा सापडण शक्य नव्हत, आणि ते धन भाऊसाहेबाच्या नशिबी आहे की नाही हेहि कळू शकत नव्हत ! म्हणून वरवाड्यात अशा लोकाना मुक्तसचार होता !

डोळ्यात अजन घालून सर्वलक्षी झाल्याचा देखावा करणाऱ्या अनेक मात्रिकाच्या वेळोवेळी झालेल्या सूचनेप्रमाण भाऊसाहेबानी सबध वाडा खणून काढला रात्री भाऊसाहेबाना स्वप्न पडू लागली कुदळीच्या घावानी जमिनीच्या पापुद्र्याचा भेद होताच मोहरानी भरलेल्या भाड्याचा खण्ऽऽ असा आवाज त्याच्या कानी येऊ लागला. हर्षवायु झालेल्या माणसाप्रमाण झोपेंतून ते एकदम जागे होऊ लागले आणि बरळू लागले !

"सापडल ! सापडल एकदाच ! पिऱ्या ! अरे जरा हळू कुदळ मार!.."

डोळे उघडून आणि नीट प्रकाश करून पाहिल्यावर मात्र ठिकठिकाणीं झालेल्या वाकड्या तिकड्या खड्ड्याखेरीज त्याना काहीच आढळत नव्हत !

खूप प्रवास केल्यामुळ, खूप श्रम केल्यामुळ आणि विचारान मेदु खूप शिणविल्यामुळ भाऊसाहेब साध्या हालचाली करायला असमर्थ झाले. भूतकाळात दृष्टि सारखी रुतविल्यामुळच की काय वर्तमान त्याना स्पष्ट दिसेनासा झाला !

मग आथरुणावर पडल्या पडल्या पूर्वजाना शिव्या देऊनच ते निष्फळतेच दु ख हलक करू लागले.

खरच, एवढी अफाट सपत्ति भावी पिढ्याना न सापडेल अशा ठिकाणी गाडून ठेवण्यात पूर्वजाचा काय मतलब होता ? की त्यात आणखी काही रहस्य होत ?

गावातल्या सर्वच सधन माणसाकड भाऊसाहेब चागल्या दृष्टीन पाहात नव्हते. चौधऱ्याच गुप्तधन सपन्न गावकऱ्यानी लाबविल असल पाहिजे, असा त्याना जबर सशय होता तिखटमिठाला महाग असलेली ती सामान्य माणसं चौधऱ्याच्या वरवाड्यातला पैसा लाबविल्याखेरीज का गबर झाली होती ? चौधऱ्याना लुटणारे हेच ते आजचे सधन गावकरी ! काय ही

कालगति ! चौधऱ्यानी त्या लोकाना साभाळल त्याच रक्षण केल. आणि परिणामी तीच माणस चौधऱ्याना लुटून सधन होऊन बसली चौधरी कफल्लक झाले ! खर म्हटल तर गावातल्या त्या सर्वच सधन माणसाची घर नागरायला हवी होती ! त्याची वतन जप्त करून टाकायला पाहिजे होती ! एकेकाला आडगावच्या शिवेबाहेर घालवून द्यायला पाहिजे होत. .

एकदा भाऊसाहेबाना पिऱ्या रामोशाच्या उजव्या हातात रुप्याच कड दिसल

माग एकदा तापाची भली मोठी साथ सर्वत्र पसरली होती त्या साथीतून पिऱ्या वाचला होता म्हणून त्याच्या आईन पोटाला अनेक चिमटे घेऊन कुठल्याशा ‘ मरीआई’च्या नवसाच ते कड करून त्याच्या हातात घातल होत !

भाऊसाहेबाना ही कारण खरी वाटण शक्य नव्हत. ते कड पाहताच त्याच्या सशयान अन् पित्तान एकदम उचल घेतली.

वरवाड्यावर हल्ला झाला त्या वेळी चौधऱ्याचा ‘ वशदीप ’ त्या काळच्या एका रामोशान वाचविला होता, ही गोष्ट भाऊसाहेब ऐकून होते. त्याच रामोशान चौधऱ्याच्या वाड्यातली सपत्ति लाबविली असली पाहिजे अस भाऊसाहेबाना वाटल त्या हलक्या जातीत प्रामाणिकपणा कुठला ? नैतिक मूल्याची कदर कसली ? रामोशी आपल्या धन्याशी इमानान वागतात, अस म्हणायला आधार काय ?

भाऊसाहेब एकदम खेसकून पिऱ्याला म्हणाले,

“ एऽ धेडग्या ! हातात रुप्याच कड घालून चौधऱ्यासमोर मिरविताना तुला शरम वाटत नाही ? कुठून आणऽस रे ते कड ? नुसत्या बलोत्यावर जगणारे महार तुम्ही ! पुन माझ्यासमोर ते कड घालून आलास तर याद राख ! हलकट........”

पिऱ्यान कड काढून देवाच्या देवळीत ठेवून दिल होत !

अशाच सशयातून भाऊसाहेबाना जमिनीवर काठी आदळून चालायची सवय लागली होती. ते महादेवाला किवा सहज इकड तिकड कुठ

निघाले तर प्रत्येक पावलागणिक काठीचा ठोका जमिनीवर मारीत ! ठोक्या-सरशी जमिनीतून खण्ऽ असा आवाज आला की, कित्येक वर्षांपासून आपण जें हुडकीत आहो, ते सापडल्यासारख होऊन आपण कृतकृत्य होऊ, असं त्याना वाटे.

पण तशी वेळ आलीच नाही !

आणि तशी वेळ न आल्यामुळ त्याचा स्वभाव अधिकच चिडखोर आणि विचित्र झाला.

आथरुणाला खिळल्यावर ते जवळून कुणालाच फिरकू देईनात. एकादा वैद्य आला आणि नाडी पाहूं लागला की आपला हात हिसकून घेत ते म्हणत,

" नाडी काय पाहतोस बोडक्याची ! आमच्या वाड्यात सपत्ति पुरली गेली आहे. तिच नक्की ठिकाण साग. ती सापडली की मी खाडकन् उठून बसेन ! .... "

भाऊसाहेबाना भ्रम झाला अस लोक समजू लागले !

एके दिवशी आतल्या घराकड तोड करून त्यानी हाक मारली,

" बकुळा ! अग एऽ बकुळा ! "

भाऊसाहेब सूनबाईला तिच्या मूळच्याच नावान नेहमी बोलावीत असत.

त्याच्या हाकेला प्रत्युत्तर मिळाल नाही

भाऊसाहेबानी आवाज चढविला,

" बकुळा ! अग बक्ये ऽऽऽ ! .... राम राम राम ! मेलीत का घरातली सगळी माणस ? .... "

इतक्यात लगबगीन बकुळाबाई आल्या आणि म्हणाल्या,

" मी आले आहे ! काय पाहिजे ? "

भाऊसाहेबानी विचारल,

" अगऽ तो 'काना' कुठ आहे ? "

भाऊसाहेब आपल्या चिरजीवाना--नानासाहेब चौधऱ्याना--तिरसट-पणानं नेहमी 'काना' म्हणत. नानासाहेब एका डोळ्यान तिरळे होते

दक्षिणेकडची वस्तु पाहण्यासाठी उत्तरेकडचा प्रकाश त्याना साहाय्याला घ्यावा लागत असे. त्याच ते तिरळ्या डोळ्यानं तिरकस पाहण, न्याहाळणं अतिशय चमत्कारिक वाटे

एकाद्या कुलागनेवर ती तिरळी नजर पडली की, मोठमोठे घातपात होत. त्या स्त्रीच सर्वांग शहारून जाई. पदर सावरल्यावरहि ती तिरपी नजर एकाद्या कुसळासारखी कुठून तरी सारखी बोचते आहे, अस तिला वाटे ! चागले चेहरे मोहरे त्या नजरेच्या तिरपीत गोरेमोरे होऊन जात.

गावकरी देखील 'काना जहागीरदार' असाच नानासाहेबाचा उल्लेख करीत

'काना मोठा हिकमती आहे, उगीच त्याच्या नादी लागू नका !' अशी अनुभवी सूचना वेळीच एखाद्या अज्ञानाला जाग करायला सिद्ध असे.

नानासाहेबाच्या डोळ्यातल व्यग गावकऱ्याना बाधल तस ते वर-वाड्यांतल्या आप्तेष्टातहि अप्रिय ठरल की काय कोण जाणे !

'काना' हा नवऱ्याचा उल्लेख ऐकण्याची बकुळाबाईंना सवय होती.

भाऊसाहेबाच्या प्रश्नाला त्यानी उत्तर दिल,

" घरी दिसत नाहीत ! "

"अग तो घरघुशा, बाहेर कशाला मरायला जाईल त्या सुद्रीच्या खोलीत बसला असेल बघ ! "

नानासाहेबाच 'सुद्री'च्या खोलीत नेहमी असण्याच रहस्य वाड्यात 'रहस्य' राहिल नव्हत ! सुदरनानीचं न् नानासाहेबाच चोरट सख्य इतरा-बरोबर भाऊसाहेबानाहि समजलं होत. परतु अशा गोष्टीची गुप्तता राखणं त्यांच्या स्वभावाला जमणं शक्य नव्हतं. अशी एकादी गोष्ट चटकन् चार-चौघात होईल एवढ्या उघड रीतीन बोलणारापैकी ते होते घरातल्या स्त्री वर्गासमोर वाटेल तस अशिष्ट बोलायचा अथवा अशिष्ट शिव्या द्यावयाचा त्याना सकोच वाटत नसे

नानासाहेबाच्या ठावठिकाणाचा त्यानी केलेला आताचा उल्लेख असाच अशिष्ट होता

बकुळाबाईना ते सगळ ऐकण्याची आणि पाहण्याची सवय झाली होती नानासाहेबाचा ठावठिकाणा भाऊसाहेबाप्रमाण त्यानाहि माहीत होता. पण कोणती स्त्री नवऱ्याच्या रखेलीच सरळ भावनेन तोड पाहू शकणार होती, आणि नवऱ्याला तिच्या खोलीतून बोलावून आणण्याची इच्छा करणार होती ?

सुदरनानीच वाड्यात फार प्रस्थ होत !

अकाल सन्यास तिच्या वाट्याला आला तरी ससारातील सर्वच सुखं ती उपभोगीत होती मस्तीच चादण तिला लपविता येत नव्हत श्रीमतीतल स्वास्थ्य म्हणून जे एक दर्शनी चिन्ह असत त्याचा साक्षात्कार ती अगो-पागावर वागवीत होती ! ती चालू लागली की अनगाचे सगळे आवेश आणि आवेग लसलसत निघाले आहेत अस वाटत होत !

ती उची वस्त्र वापरीत होती. अगावर अलकार घालीत होती. भडक रगाच्या अभ्र्याच्या उशावर डोक ठेवून सूर्यप्रकाश बराच वर येई-पर्यंत झोपून राहात होती आणि मग उठून खाली आली की प्रियकराच्या मिठीत रात्र जागून काढल्याची सुस्ती तिच्या पापण्याव· लोबकळल्यासारखी दिसत होती आणि तिच्या पदक्रमातून अडखळत प्रकट होत होती! पानप्रसगातील दगामस्तीच्या खुणा लपविणारी सभ्यता निराळी ! आणि पानप्रसगातील दगामस्तीचे मावळते झोक अगातील आळोख्यापिळोख्यातून मुद्दाम प्रकट करण्याचा आवेश निराळा !

सुदरनानीच्या अशा आवेशानी वाड्यातली कुजबुज केव्हाच मावळली होती ! सशयात्म्याचे सशय नाहीसे झाले होते. दुरून पाहणारे आणि खऱ्याखोट्याचे तर्क लढविणारे सत्य जाणून चुकले होते ! नौकरवर्ग बकुळा-बाईऐवजी नानीलाच ' बाईसाहेब ', 'बाईसाहेब' अस म्हणत होता.

सुदरनानीचा नट्टापट्टा पाहून बकुळाबाई म्हणत होत्या,

" सटवीन कुकूच लावायच का बाकी ठेवलं आहे कळत नाही ! "...

सुदरनानीची कथा अशी –

वयान वाकलेले आणि शक्तीन खचलेले 'धारपिंपरी'चे देशमुख आथरुणाला खिळले काढे, चाटण, भस्मे, गोळ्या आणि मात्रा उलटून पडू लागल्या.

देशमुख अखेरच्या रस्त्याला लागले, अस दिसू लागल !

सुदरनानी नावाची त्याची तरुण रूप-सपन्न बायको आणि वारसावाचून वाया चाललेली भली मोठी इस्टेट माग राहाणार होती. आप्तेष्टापैकीच एकादा मुलगा दत्तक घ्यावा अशा अनेक सूचना देशमुखाना येत होत्या आणि त्या निमित्तान देशमुखाचा एक भला मोठा गोतावळा आपापली मुल घेऊन धारपिंपरीला मुक्काम करून थाबला होता !

सगळी 'जायदाद' एकाद्या महाराच्या घरात गेली तरी हरकत नव्हती. पण रक्ताचे सबध असलेल्या भाऊबदाना तिचा थोडासा देखील भाग मिळू नये, असहि काहीजण म्हणत होते

देशमुखाच्या समाचाराला गेलेले आणि सुदरनानीचा पाहुणचार घेत राहिलेले नानासाहेब चौधरी वरील सूचनेचा आग्रह धरण्यात अग्रेसर होते. देशमुखीणबाईला—सुदरनानीला ते पटत होत पण देशमुख खोल आवाजात म्हणत होते,

"अस करून कस चालेल ?"

दत्तकविधान झाल. आणि देशमुख खरचले सुदरनानी त्या दत्तकविधानावर अर्थात् नाराज होती नानासाहेब चौधऱ्यान या घटनेतले बारकावे हेरले. त्यानी सुदरनानीला हाताशी धरून मुकदमा लढवायला आणि पैरवी करायला आरभ केला.

"पतिनिधनाच्या वेळी, सुदरनानीला चौथा महिना होता, त्यामुळ दत्तक घ्यावयाची आवश्यकता नव्हती ! दत्तकविधान झाल, ही गोष्ट खोटी, इस्टेटीच्या लालचीन देशमुखाच्या जवळपास वावरणारी माणस 'दत्तकविधान' झाल असा बनाव करून देशमुखाची इस्टेट बळकावू पहात होती ! "

अशा भरीव कारणानी जिल्हयाच्या कोर्टात कामकाज सुरू झाले.

नानासाहेब चौधऱ्यानी पहिलं कोर्ट जिकल. पण पु च्या पायरीवर मात्र सबध प्रकरण बारगळल. तें अगावर आल नाही म्हणून खैर झाली. नानासाहेबानी मग सुदरनानीसह हाताला येईल तेवढ देशमुखाच रोकड धन उचलल आणि वाड्यात सरक्षणासाठी आणून ठेवल. मग नानीच्या सहीन दत्तक देशमुखावर पोटगीचा दावा लावला !

नानीजवळचा सोन्याचा तोळामासा हाती यावा म्हणून की काय कोण जाणे–नानासाहेब तिच्याभोवती गोडा घोळीत होते. तिच्या मर्जीला कसलाच विरोध होणार नाही, अशी खबरदारी घेत होते सकाळी चहाच्या वेळी ते तिला उठवून आणीत होते जेवणाच्या वेळी आंतल्या खोलीत माडलेल्या पाटावर घोळदार पद्धतीन इरकली साडी नेसलेली, स्नानोत्तर सुप्रसन्न आणि म्हणूनच अत्यत मोहक दिसणारी, नानासाहेबाच चित्त नेहमी आपल्या नजरेच्या जाळ्यात घायाळ होऊन गुतलेल पाहण्यात सौख्य मानणारी, सुदरनानी येऊन बसल्यावरच नानासाहेब पहिला घास घेत होते ! बायकोन लावून ठेवलेल पान नानासाहेब चघळल्यासारखं करीत होते आणि मग मनासारख पान खाण्यासाठी नानीच्या खोलीत (की विलासमदिरात) प्रवेश करीत होते. नानीला खोकला, पडस आलं तर गावातल्या वैद्याला घरी येईतो कैक बोलावणी जात होती ! औषधोपचार नानासाहेब स्वत: आपल्या हातान करीत होते नानीचे हातपाय दाबीत असताना नौकर वर्गानी कित्येक वेळा त्याना पाहिल होत. नानासाहेब गांवी गेले की, नानीच्या खोलीतली रात्र सरता सरत नव्हती. नानासाहेब परत गावाहून आले की रात्र लवकर होत नव्हती ! ताब्या भाडं घेऊन माडीच्या पायऱ्याकड वळणार नानासाहेबांच कलत्र बैठकीत बसलेल्या नानासाहेबाना म्हणत होत,

" अथरूण टाकल आहे .... "

नानासाहेब कुटुबधर्माचं पालन करीत होते ! नानी हे ऐकत होती आणि पाहात होती. मग मध्यरात्रीच्या सुमारास नानासाहेबाच्या शयनागाराच्या दारावर थाप मारून कप आलेल्या आवाजांत नानी म्हणत होती,

" अरे नाना ! मला कसंच होत आहे रे ! जरा वैद्याला...."

नानासाहेब घाबरून गेल्याचा देखावा करून बाहेर येत होते. मग दंडाला धरून नानीला तिच्या खोलीत नेत होते. आणि नानी दाराला कडी लावून दिव्याच्या उजेडात विवेक मालवून टाकीत होती. एकाद्या प्रचड लाटेच्या धारेत सापडल्यासारखी नानासाहेबाची अवस्था होत असल्यास न कळे !

लग्नाच्या बायकोन तरी मर्यादा कुठवर ठेवायची ? वाहवत जाणाऱ्या नवऱ्याला सावरण कुलांगनेच कर्तव्य नव्हत काय ?

अस काही झाल की बकुळाबाई नानीच्या खोलीच दार खडखडवीत होत्या. अन् नानासाहेबाना उद्देशून म्हणत होत्या,

" अहो ! सपल की नाही 'दवापाणी' अजून ! मी एकटीच आहे खोलीत ! .... "

बकुळाबाईना या प्रयत्नात कधीच यश आल नाही. मग डोळे उघडे ठेवून पाहू नये ते त्या पाहू लागल्या आणि सोसू लागल्या.

चौधऱ्याच्या वरवाड्यातले मध्यरात्रीचे मद दिवे हे अनाचार आणि अत्याचार पाहून काजळून जात होते ! ....

भाऊसाहेबाच्या सागण्याप्रमाण बकुळाबाईना सुदरनानीच्या खोलीवर नानासाहेबाना बोलावून आणण्यासाठी जाण्याची वेळ आली नाही. कारण तितक्यात सुदरनानीच्या खोलीचा दरवाजा उघडून नानासाहेबच बाहेर येताना दिसले. बकुळाबाईंनी जवळच्या नौकराला त्याना बोलवायला सागितल आणि नानासाहेब भाऊसाहेबाजवळ येताच त्या तेथून सरकल्या.

भाऊसाहेबाची दृष्टि हाताच्या अतरावरचहि पाहू शकत नव्हती. नानासाहेबांनी त्यांचा हात हातात धरला आणि आपल्या आगमनाची सूचना देण्यासाठी दर्द भरल्या आवाजात म्हटल,

" मला बोलावलत आपण ? "

" होय ! "

भाऊसाहेबानी 'हो' ला लाबवून 'य' वर खूप जोर दिला आणि मग ते म्हणाले,

" आमची एक इच्छा आहे नानासाहेब ! "

नानासाहेबाना भाऊसाहेबाच्या इच्छेचा बोध झाला नाही. एकाद्या महाभागाच वचन ऐकण्यासाठी आदरयुक्त औत्सुक्य दर्शवाव, तशा तऱ्हेन नानासाहेब म्हणाले,

" बोला ! "

" आजवर तुम्ही सर्वांनी मला वेड्यात काढल ! भ्रमिष्ट समजून मला तुच्छ लेखलत ! .... "

" आपल्या सेवेत काही उणेपणा राहिला काय ? "

" आमची सेवा करावी अस खरच मनापासून तुम्हाला वाटत काय? "

" अस काय बोलता आपण ? आपण आम्हाला जन्म दिला. वाढविल, नांवारूपाला.... "

" धन्य ! धन्य ! आपण आम्हाला पितृस्थानी लेखता हे केवढ आमचं भाग्य ! पण आम्ही तुमच्यासाठी माग काही ठेवल नाही म्हणून आम्हाला हिणवायचा तर तुमचा हेतु नाही ना ? "

" वा ! वा ! हे काय बोलणे ? "

" ते काही असो! आपल्या पूर्वजानी जे सचित ठेवल आहे ते आम्ही आमच्या हातानच तुमच्या स्वाधीन कराव अस आम्हाला फार वाटत ! आमची मनोदेवता सागते की आपल्या पूर्वजानी जे धन ठेवल आहे ते नक्की या भितीतूनच कुठ तरी आहे ! त्याच अस आहे नानासाहेब ! सपत्ति आधळी असते ! तिला मार्गी आणण आपल काम असत ! तुम्ही माझी कसलीहि सेवा केली नाहीत तरी या सगळ्या भिती एकदा माझ्या-समोर खणून काढा .... "

नानासाहेब चौधऱ्यानी चर्या गभीर केली. वाड्याच्या सर्वच भिती खणून काढायच्या म्हणजे वाडा 'भूमिगत' केल्याशिवाय गत्यंतर नव्हत !

शहाणा माणूस अस करील हे शक्य नव्हन ! पण मृत्युशय्येवर पडलेल्या भाऊसाहेबाना नकार देण योग्य नव्हत नानासाहेबानी त्याच्या इच्छेला चटकन् होकार भरला एकदोन वेळा कुठ कुठ खणण्याची उगीच बतावणी झाली. मग भित पाडीत असता एका मजुराला भूतबाधा झाली अशा सबबीवर काम बद ठेवण्यात आल !

भूतबाधेची वार्ता भाऊसाहेबाना समजली मात्र ! त्यांची खात्रीच पटली की भूमिगत झालेल चौधऱ्याच्या पूर्वजाच धन नक्की त्या भितीतून कुठतरी आहे आणि चौधऱ्यानाच ते लाभण्याची शक्यता आहे ! मजुराचे हात देखील ते जवळ येऊ द्यायला तयार नाही ! खर म्हणजे एकतर त्यानी स्वत किंवा नानासाहेबानच भित खणायला पाहिजे होती !

भाऊसाहेब तळमळून म्हणू लागले,

"नाना ! नानासाहेब ! अहो तुम्ही स्वत कुदळ हाती घ्या ! ही सधि दवडू नका ! ."

नानासाहेबाकडून काहीच उत्तर आल नाही !

मग भाऊसाहेब आथरुणावरल्या आथरुणावर तडफडून म्हणू लागले,

"काय करू रे ! परमेश्वरान मला आणखी काही दिवस चांगल ठेवायला हव होत ! भेकड आहेत सारे ! आणा इकडं कुदळ.... "

कुदळ घेण्यासाठी म्हणून भाऊसाहेब उठले आणि लगेच आथरुणावर आदळले.

त्याचा श्वास एकाएकी कमीजास्त होऊ लागला आणि मग एकदम थाबला !

गगेवर त्याच्या पिडाला कावळा शिवला नाही !

काय असेल ते असो, भाऊसाहेबाच्या स्मशानयात्रेवरून आलेली माणस बरेच दिवस आजारी होती. त्या सर्वांना म्हातारा लागला होता !

भाऊसाहेबाच्या दहनभूमीकड बायाबापड्या आपल्या मुलाबाळांना कित्येक दिवस फिरकू देत नव्हत्या. निवान्त अशा एकाद्या अमावास्येच्या

मध्यरात्री हातातली काठी जमिनीवर जोरान आदळीत वरवाड्याच्या रोखाने कुणी तरी जात येत होत, अस कित्येक दिवस लोक बोलत होते !

वरवाड्याच्या पडलेल्या भागाची आता बाधणी सुरू झाली होती !

वर्षाच्या फेऱ्या घालून कालाचे पाय वरवाड्यावरून सरकले होते ते प्रत्येक पदाघाताला एकेक थर निखळवीत. वाळलेल्या गवताचे तुरे उभारून उपेक्षा कित्येक दिवसापासून त्या भागात ससार माडून होती उदीर घुशी पडक्या भिताडाना पोखरीत होत्या. रात्रीच्या आंधळ्या आकाशातून पख जोरान फडफडवीत जाणार एकाद रातपाखरू आपला महाल समजून तिथच खात्रीन वसत आणि घुमत असल पाहिजे !

चौधरी घराण्यातले कालवश झालेले सगळे महापुरुष नानासाहेब चौधऱ्याच्या उशाला येऊन बसत असावे आणि म्हणत असावे,

"कुलांगार ! काहीच करता आल नाही तरी निदान वाड्याचा पडका भाग तरी बाधून काढ !"

ही प्रेरणा घेऊनच की काय कुणाला माहीत नानासाहेब चौधरी वाड्याचा पडका भाग बाधायला सिद्ध झाले होते.

प्रवेशद्वारापुढल्या पटागणात खाणीतून फोडून आणलेल्या फाडीचे प्रमाणबद्ध चबुतरे रचले जात होते. भट्टीवरून आलेल्या लालसर विटाचे ढीग वाढत होते. दगडावर छन्या आदळून त्याना चौकोनी आकार येत होता. आणि त्याच्या खडबड अगाना चोपड केल जात होत. लाकड्याच्या चौधारी नाटाची कटाई, तासण, रधण पाहून फार मोठ्या जोडणीची तयारी चालू आहे, हे उघड दिसत होत !

चौधऱ्यानी हे वैभव कुठून आणल होत ?

भाऊसाहेब चौधरी ज्यासाठी तडफडून मेले ते भूमिगत धन नाना-साहेबाना लाभल होत काय ? लोकात तर काही निराळीच चर्चा होती ! आधळ्या नशिबान 'कान्या' चौधऱ्याला हात दिला होता ! नानासाहेबानं

सुदरनानीच सगळ सोन नाण दाबल होत न् खटके उडू लागले तेव्हा तिला विष घालून नाहीस केल होत ! पैसा मिळविण्यासाठी नानासाहेब चौधऱ्यानं अमक एक कृष्ण कृत्य करायच बाकी ठेवल होत अस म्हणता येणार नाही!

लक्ष्मीन चौधऱ्याना पुन्हा वरल होत ! नानासाहेबासारखा 'काना' माणूस लक्ष्मीला आवडावा हे नवल नव्हत ? माणसाच रूप, त्याची दानत, त्याच चारित्र्य, या गोष्टी माणसात नसल्या तरी आपल्या स्पर्शान त्या उत्पन्न करू अस तिला वाटत असाव ! माणसातलं विशेष अस ती कांहीं पाहात असेल तर त्याचा हात !

सढळ हातातून ती निसटून जाते. पण जो हात सभावितपणान चोऱ्या करतो, प्रेमाचा देखावा करून विष पाजतो, सहानुभूतीच सोग घेऊन काळ-जाचा खड तोडतो, मार्गदर्शनाच्या मिषान गर्तेत लोटतो, त्याच हातावर ती लुब्ध होते !

नानासाहेब चौधऱ्याची अशीच अनेक सामर्थ्यं सपत्तीन ध्यानीं घेतली असावी !

नानासाहेबाच्या अशा अपूर्व सामर्थ्याचा एक जिवत नमुना आजहि वाड्यात जाताना आणि येताना दिसत होता !

वरवाड्यातल्या एका लहानशा एकाकी माडीच्या खिडकीतून राजा-भाऊ देसाई पडक्या वाड्याच्या पुनर्रचनेच्या तयारीकड टुकटुक पाहात होते. त्याना सगळंच शून्य आणि निरर्थक वाटत होत. सभोवतालच्या हालचालीनी त्याच्या अत.करणाचा कुठलाच कोपरा फुलून येत नव्हता. त्याच्या स्वत च्या हालचालीतहि कसलच औत्सुक्य नव्हत. जीव होता म्हणून त्यांच अग हालत होत इतकच !

राजाभाऊच्या तळपायाना कसल्याशा रोगामुळ मोठमोठ्या भेगा पडल्या होत्या. त्यामुळ पाय जमिनीवर टेकवून त्याना उभं राहतां येत नव्हत आणि चालताहि येत नव्हत ! इकडून तिकड सरकायच झाल तर तळहात जमिनीवर टेकवून त्याना फरकत जावं लागत होत. चालण, फिरण, पळणं या क्रियाचा त्यांना अजिबात विसर पडला होता. राजाभाऊंना

पाय असते तर खिडकीतून दिसणाऱ्या टेकड्यावर उजवीकडून साडणारा कोवळा प्रकाश अगावर घेत ते थेट पलीकड धावत गेले असते आणि त्यानी आपल झाडगाव गाठल असत. त्याच्या झाडगावातल्या चिरेबदी वाड्याच्या दर दिवाळीला तेलपाणी देऊन चोपड्या केलेल्या उच आणि रुद प्रवेशद्वाराची ती विशिष्ट बाधणी ते विसरले नव्हते. त्या वाड्यातली त्याची ती प्रशस्त बैठक, ती पलीकडची स्त्रीजनाच्या सहवासान नेहमी भरल्यासारखी दिसणारी ओसरी, ती धान्य साठवायची लहान कोठार, आणि ती वरची माडी म्हणजे त्याच शयनमदिर ! . . .

कल्पनेन राजाभाऊ सर्व काही पाहू शकत होते. त्या त्याच्या चिरप्रिय वातावरणातून जबरीन उचलून नानासाहेब चौधऱ्यानी राजाभाऊना बदिस्त करूनच वाड्यात ठेवल होत न् काय !

सकाळी सूर्यप्रकाश पहावा, चौधऱ्याच्या नोकर वर्गाच्या मर्जीला येईल त्याप्रमाण दिनचर्या करून घ्यावी, माडीच्या या भितीपासून त्या भितीपर्यंत फरकत सरकत जाव, खिडकीशी येऊन टुकटुक पहात बसाव, नाहीतर आथरुणावर पडून डोळे मिटून घ्यावे किंवा डोळे उघडे ठेवून अधाराच कवच उगीच टोकरण्याचा प्रयत्न करावा, असा त्याचा कार्यक्रम होता त्यांत दिवस लुप्त झाले होते. रात्री खलास झाल्या होत्या. वर्षाची गुफण करीत महिने तुटून गेले होते आणि वर्षं उडून जात होती !

राजाभाऊ देसाई म्हणजे नानासाहेब चौधऱ्याचे ज्येष्ठ जामात. झाडगांवकर देसाई त्या काळातहि नामवत आणि सधन होते त्याची इस्टेट चौघा भावात विभागली गेली तरी राजाभाऊ देसायाच्या वाट्याला एक मोठा चिरेबदी वाडा, अडीचशे तीनशे तोळे सोन आणि तितकेच एकर ओली सुकी जमीन आली होती !

नानासाहेब चौधरी मुलीला स्थळ पाहात होते. राजाभाऊना त्यानी निवडल. प्राथमिक भेट आणि भाषा झाली. आलेली लक्ष्मी डावलायची नाही असा मोठ्या मनाचा श्रद्धायुक्त विचार देसायाकडल्या मडळीनी पक्का केला. सगळ नक्की झाल. हजारानी हुडा ठरला. चौधरी देसायाचे ऐतिहासिक सोयीरसबध होतेच !

झाडगावी थाटामाटात लग्न झाल.

लग्नात भाडण व्हायची वेळ आली होती. पण देसाई सधन तसेच सात्त्विक, सुजाण आणि म्हणूनच सोयीरसबधाचा सत्कार करणारे !

अक्षता पडल्या तरी हुडयाची रकम येईना ती मागण्यासाठी एकदांच देसायाकडून माणूस आला. नानासाहेब चौधऱ्यानी आपला तिराळा डोळा आडगावच्या रस्त्यावर बराच वेळ रोखला त्याचे कारभारी का येत नव्हते कळत नव्हत !

लगीन आटोपल. निर्लज्ज माणसाना लाजवायच नाही अशा विचारानं हुडयाच्या रकमेची पुन्हा बातचीत निघाली नाही मग राजाभाऊ एकदोन वेळा सासुरवाडीला आले. जहागीरदाराच्या जावयाच व्हाव तसच स्वागत झाल आणि सन्मानानंच त्याची परतपाठवणी झाली.

काही दिवसानतर राजाभाऊना पायाचा रोग जडला. सामान्य आजारान सुरवात होऊन लाबलेल्या दुखण्यात त्याची बायको आटोपली. स्वत च्या पायाच्या न् बायकोच्या दुखण्यात बरीच रकम खलास झाली. बायको वाचली नाही. त्या दु खात स्वत कड दुर्लक्ष होऊन राजाभाऊचे तळपाय अधिकच अधू झाले !

पहिल्या दहा दिवसातच वधूपिते राजाभाऊकडं चकरा करून होत. नानासाहेब चौधरी दु खात असूनहि फार जागरूक होते, मोठ्या प्रेमानं नानासाहेबानी राजाभाऊला पायाच्या इलाजाच्या निमित्तान वरवाडयांत आणल. नानासाहेबाची धाकटी मुलगी पुतळा लग्नाची होती. राजाभाऊच्या पायाच एकदा ठीकठाक झाल की जवळचा मुहूर्त धरला जाऊन शुभमगल होणार होत !

नानासाहेब सोयीरसबंध दृढतर करण्याच्या निश्चयानच वागत होते !

राजाभाऊचे पाय बरे होईपर्यंत त्याची शेतीभाती आणि घरदार पहायला नानासाहेबाखेरीज विश्वासू माणूस कोण होता ? भाऊबद तेवढे लबाड ! ते कोणत्या वेळी काय करतील याचा नियम नव्हता !

वरवाडयात आल्यावर राजाभाऊना एक स्वतत्र माडी देण्यात आली. त्याची सगळीच व्यवस्था बादशाही होती. प्रात काळी उष्णपेय,

आणि उपाहार ! दुपारी रुचकर जेवण ! रात्रीच्या जेवणांतला चमचमीत-पणा निराळा. प्रकाशाचं साधन म्हणून चांगला मोठा दिवा आणि उंची नरम आथरूण !

जेवायला तीनचार बोलावणी घेतल्यावरच प्रति रात्री ओसरीच जोत चढताना नानासाहेब खणखणीत आवाजात विचारीत होते,

" जावईबुवांच जेवण झालय काय ? त्याच्या माडीत दिवा आहे की नाही ? काय ? राजाभाऊ जेवायच नाही म्हणतात ? निदान दूध न् केळी घ्या म्हणाव ? "

हे नियमान विचारणं अनियमित झालं. काही दिवसानतर तर नानासाहेबाचा आवाजहि ऐकू येईनासा झाला. कधी तो कानी आलाच तर एकाद्या खडबड दगडानं अग घासाव, तसा तो राजाभाऊना रुतू लागला.

राजाभाऊच्या पायाच्या इलाजासाठी प्रथम प्रथम एकदोन मामुली वैदू आले. त्यानी राजाभाऊची नाडी पाहिली आणि काही औषधयोजना केल्या !

पुढ काढे बद झाले. एके दिवशी राजाभाऊच्या खोलीतला थोरला दिवा उचलला गेला. आणि मग राजाभाऊ देसाई उपेक्षेंत खचले, आणि अधारात रुतले !

कारण राजाभाऊच सगळ सोन–नाण आता नानासाहेबांच्या हाती आल होत !

राजाभाऊनी दोनतीन वेळा गांवी जाण्याची गोष्ट काढली पहिल्या-वेळी नानासाहेब चौधरी जवळ येऊन म्हणाले,

" राजाभाऊ ! एकटेच कुठ जाता ? करून घालायला तरी कुणी पाहि-जेना ! अहो, लगीन आटोपल्यावरच जा झाल ! ...."

दुसऱ्या वेळी नानासाहेबानी तोंडी निरोप पाठविला,

" आताच जाण्याची गडबड करूं नका म्हणाव ! इथ कांही रानात पडले नाहीत ते ! चागल खा प्या म्हणावं ! एकदा त्याचे पाय नीट झाले

की त्याना ठेवून घ्यावयाची आम्हाला का हौस आहे ? मिरजेच्या वैद्याला पत्र घातलच आहे, 'बल्या'हूनहि एकदोन हकीम यतील ! तवर रहायला काय हरकत आहे ?''

तिसऱ्या वेळी कारभाऱ्यान येऊन सागितल, ''जाण्याची गोष्ट काढताच नानासाहेब चौधरी काहीच बोलले नाहीत ! ....''

निरोपाची अशी बोळवण झाल्यावर साधी भाषाहि बद झाली.

मग एकाद्या अर्ध मेल्या उदराची शक्ति घेऊन राजाभाऊ जगण्याची धडपड करीत होते, माडीच्या या भितीपासून त्या भितीपर्यंत ते फरकत जात येत होते. अशा फरकण्यान तरी पायातला जीव जागा होईल, अस त्याना वाटत असाव थकवा आला की ते खिडकीतून खाली अगणात पाहात बसत होते. पाहण्याच काम सपल की वाड्यातल्या व्यक्तीच्या आवाजाचा वेध घेत होते. एकादा आवाज ऐकला की तो अमक्या व्यक्तीचाच आहे की नाही, हे ठरविण्यासाठी खिडकीतून पुन्हा वाकून पहात होते काहीच करता येत नसल्यामुळ त्याची विचारक्रिया जोरान कार्य करीत होती ! कल्पनाशक्तीला वेग येत होता ! ....

प्रत्येक शब्द निवडून दर्द आणि सहानुभावान घोळून उच्चारणारा आवाज नानासाहेब चौधऱ्याचा होता. एकाद्या चचल ताजव्यान सोन तोलायला जी चलाखी लागते, ती नानासाहेबाजवळ होती हे नक्की ! थोडासा चढेल आणि मस्तवाल आवाज होता तो नानासाहेबाचे ज्येष्ठ चिरंजीव रावसाहेब याचा. त्याच्या दोन्ही धाकट्या भावाचे आवाजहि तसेच होते. त्या सर्वाची सरमिसळ झाली म्हणजे रावसाहेबाचा आवाज कोणता, दादासाहेबाचे शब्द कोणते आणि आबासाहेबाचे उच्चार आणि उद्गार कोणते, हे लवकर उलगडता येत नव्हत !

ते आवाज दूर गेले अथवा काही कारणानं थाबले की राजाभाऊ स्त्रियाच्या आवाजाचा कानोसा घेत. चढत्या यौवनाची झाक दाखविणारा एक बारीक भिगरीसारखा धारदार आवाज त्याना पुन पुन्हा ऐकावासा वाटू लागला. सकाळ होताच खिडकीच्या कठड्यावर रेलून त्या आवाजातले

चढउतार ऐकण्यासाठी ते उत्सुक दिसूं लागले सगळ नीरव झाल तरी त्या आवाजातील हाक, हाकेच प्रत्युत्तर, त्यातील क्वचित् रुष्टतेचे उद्गार अथवा हास्याचा मोकळा खळखळाट राजाभाऊना अतिशय जवळून ऐकू येऊ लागला त्या निनादाचे मोहर सभोवतालच्या निशब्तेला लटकत आहेत अस वाटू लागल !

तो आवाज राजाभाऊच्या मेव्हणीचा--त्याच्या नियोजित वधूचा होता. आणि विशेष हे की तो थेट त्याच्या दिवगत पत्नीसारखाच होता !

जेवणाच ताट घेऊन एकदाच राजाभाऊंची मेव्हणी माडीवर आली. राजाभाऊना वाटल हात धरून तिला जवळ बसवाव आणि आठवणीनी ओल व्यथित झालेल वैवाहिक जीवन पुन्हा उजळून घ्याव ! पण सज्ञेचा करणात्मक निश्चय होण्याच्या आतच ती झरझर पायऱ्या उतरून गेली आणि राजाभाऊच्या मनात तिच्या चपलतेचे विचार घोळू लागले. एक दोन वेळा त्याच्या नजरेला नजर भिडविण्याचा तिने प्रयत्न केला की, काय कोण जाणे !

राजाभाऊंनी मात्र तिला अनेक अगानी पाहून घेतल होत तिच्याशी ते आता मुक्त एकान्त करू लागले. आपल्या बाहूच बधन तोडून ती किशोरी केव्हा निघून गेली अशा गोड सभ्रमात ते सकाळी उठू लागले. आणि अधार झाला की तिची प्रतीक्षा करू लागले.

अखेर या स्वप्नाला एक जबर तडाखा बसला त्याच्या मेव्हणीच लगीन झाल ते राजाभाऊशी नव्हे तर [illegible] जहागीरदाराशी !

देशमुख, देसाई, देशपाडे चौधऱ्याच्या मोठ्या नावाला कमी पडत होते म्हणन यावेळी जहागीरदाराशीच सोयीरपण जोडल होत !

राजाभाऊच समाधान करायला (की नसत्या शब्दाच्या आघाताना माणस मरतात की नाही हे पहायला) नानासाहेबाचे कारभारी वर आले आणि इकडची तिकडची विचारपूस सपवून सदर्भ येताच [illegible] सागू लागले,

"चौधऱ्याचा दिवस खालावत चालला आहे राजाभाऊ! रेणाखळीकराचं फार मोठ कर्ज होत चौधऱ्यावर! मालमत्तेवर येणारी जप्ती टाळण्यासाठी नानासाहेबानी रेणाखळीकराशी हे लग्नाच जुळवल! तुमच नाव काढल की नानासाहेब डोळ्याला पाणी आणतात ......"

राजाभाऊ एकदम उसळून म्हणाले,

"सगळ ढोंग आहे हे! मला समजत का नाही लग्नातला हुडा बुडविला. पायाच्या इलाजाच्या निमित्तान सोननाण दाबल शेतीचं उत्पन्न दरवर्षी घशात चाललच आहे! धन्य धन्य आडगावकर चौधरी! तुम्ही आता जास्त बोलाल तर थोबाड फोडीन! चला चालते व्हा!"...

राजाभाऊच सबध अग यावेळी थरथर कापत होत. पाणी प्याववाचं भाड उचलून त्यानी कारभाऱ्याच्या दिशेन भिरकावल. कारभाऱ्याने तोड चुकविल आणि भितीवर आदळलेल्या भाड्याचा जमिनीवर पडून खण्ऽ असा आवाज झाला!

अस झाल्यावर राजाभाऊना वेड लागल्याची वार्ता वाड्यात पसरली-
खायच प्यायच वेळेवर येईना तेव्हा राजाभाऊ ओरडू लागले,
"अहो. जेवण पाठवा!"
रात्री दिवा लागला जाईना राजाभाऊ किंचाळू लागले,
"अहो दिवा आणा ना वर!"

प्रत्युत्तरादाखल कुणाच्या तरी हास्याचा आवाज कानी येत असे. आपल्या हाकाना भीक घालण्याची कुणाची तयारी नाही अस दिसताच राजाभाऊ खिडक्याची दार खडखडवू लागले. खिडक्याचे लाकडी कठडे पाण्याच्या ताब्याभाड्यान ताडू लागले.

एकाद्या नवागतान या प्रकाराची चौकशी केली तर नानासाहेब चौधरी उत्तर देत, "ते आमचे झाडगावकर देसाई! अनेक इलाज करूनहि अखेर त्याच्या पायाच दुखण बर झाल नाही. दुर्दैवी! एकाच ठिकाणी सारख बसून कटाळल्यामुळ कधी कधी चिडतात आणि वेड्यासारख करतात घरी नेहमी गाण बजावण चालत असे. दार वाजवून जिवाची करमणूक करून घेतात बिचारे!"...

दारांची खडखड दिवसेंदिवस जोरान होऊ लागली. हाताला येईल ते राजाभाऊ अंगणात भिरकावू लागले. खिडकीतून दिसेल त्याला शिव्या देऊं लागले. एकदा रात्री रावसाहेबाची झोपमोड झाली. ते राजाभाऊच्या माडीत आले आणि त्यानी राजाभाऊच्या पाठीत दोन लाथा मारल्या. काहीच प्रतिकार न करता आल्यामुळ खाटकाच्या सुऱ्याखाली आलेल्या एकाद्या ढोरासारखा राजाभाऊनी चमत्कारिक रुदनस्वर काढला. अपमानाच्या आणि असफल क्रोधाच्या दाहात ते रात्रभर बेचैन होते !

एका सध्याकाळी राजाभाऊनी आपली शक्ति पणाला लावली. जिन्याखाली हळू हळू ते उतरले. अधारात फरकत त्यानी मोठ दार गाठल. ते रस्त्याला लागले. त्याना झाडगाव गाठायच होत. त्याच्या गतीला युगं हसली तरी त्याची त्याना खत नव्हती ! चौधऱ्याच्या कचाटयातून ते सुटले होते, हेच महत्त्वाच होत !

राजाभाऊच्या माडीत काही न्यावयाला आलेल्या नौकरान राजाभाऊ ठिकाणावर नसल्याची ओरड केली.

" जावईबापू माडीत नाहीत ! "

ते खिडकीतून खाली पडले की काय हे सर्वांनी बारकाईन पाहिल. सबध वाडा शोधला गेला. मग माणस कदील घेऊन गाव शोधायला निघाली.

राजाभाऊनी चादण्यात पडलेली वरवाडयाची सावलीहि ओलांडली नव्हती !

स्वत: नानासाहेबानी त्याना उचलल, आणि एकाद्या फुलासारख धरून माडीत आणून ठेवल. ते म्हणाले,

"राजाभाऊ ! हे काय ? काही कमीजास्त झालं तर मला सांगायच ! ....का एकदम रागावून निघून जायच ?"

मग नानासाहेबानी घरातल्या माणसाकड वळून म्हटल, " तुम्ही सगळीच माणस फार हलगर्जी झाला आहा ! वाडयांतल्या माणसाची पूसतपास करण्यापुरतीहि तुम्हाला सवड नाही ! मी माणस जोडायला बसलो आहे, तोडायला नाही. निव्वळ आपापल्यापुरत पाहणं चौधऱ्यांच्या घरात शोभणार नाही ! "

एकाद छायाहीन निष्फळ आणि निष्पर्ण झाड हालल्याप्रमाणच नाना-साहेब चौधऱ्याचा तो हृदयाविष्कार वाटला!

आता मात्र राजाभाऊचा चागला बदोबस्त झाला होता!

राजाभाऊकडं सगळीच माणस आता पाहून हसत. एकदां त्यांनीं आपला चेहरा आरशात पाहिला. त्याना भयकर वेदना झाल्या.

एका काळचा झाडगावचा तरुण देखणा देसाई इतका भयाण, विद्रूप झाला होता की त्याच प्रतिबिंब पाहणारे डोळेच भ्याले होते!

राजाभाऊच सबध उमेदीच जीवन कोसळवून पडक्या वाड्याच्या पुनर्रचनेची नानासाहेब चौधऱ्याची योजना मात्र सफल होत होती!

अखेर तो अपग, हतभागी आणि कष्टी जीव, एकदाचा त्या कोंड वाड्यातून सुटला! रेणाखळीकर जहागिरदारान लवकरच कान काढले. त्यान नानासाहेबाकडून हुड्याची रक्कम वसूल करूनच बोहल्यावर पाय ठेवला. पण लगीन झाल्यावर बापाकडून आणखी रक्कम आण म्हणून त्यान बायकोला आडगावी परत पाठविल. तो छद फद करू लागला आणि रक्कम आणली नाही म्हणून बायकोला झोडपून काढू लागला! मग नानासाहेब चौधऱ्याची मुलगी माहेरपणाला आली ती परत गेली नाही. ती खगली आणि अखेर एक दिवस गतप्राण झाली. तिच्या मृत्यूची वार्ता कानी येताच राजाभाऊ माडीतल्या माडीत मोठ्यानं हसले. तिच प्रेत निघाल तेव्हा तिला एकदा अखेरच पहावं म्हणून त्यांनीं खिडकीतून तोड काढलं. ते पुढ झुकले. आणि नेहमीच्या 'तबला-वादना'च्या लहरीत खिळखिळा झालेला खिडकीचा कठडा उखळला आणि राजाभाऊ धाडकन् अगणांत पडले!

एकाद्या कोऱ्या कागदावर त्याची सही घेतां आली नाही म्हणून नाना-साहेब अतर्यामी हळहळल्याशिवाय राहिले नाहीत!

जांबखेड रस्त्यानं आलेल्या पांढऱ्या खिल्लारी जोडीचा तांगा मारोती-पुढून गावात शिरला आणि वरवाड्याकडं जाऊ लागला, ताग्यापुढं धांव-

णाऱ्या ' धन्या ' नावाच्या महाराच्या आणि तागा हाकणाऱ्या राध्याच्या चेहऱ्यावर हसू दिसलं की, पाहणारे एक दुसऱ्याला सागत,

" वहिनी आल्या ! "

राजणात बुडवून घेतलेल्या लोटक्यातल पाणी पिता पिता मजुळा महारीण एकदम उभी राहात होती धावत्या छकड्याच्या उडणाऱ्या पड्द्याआड बसलेल्या वहिनीच ओझरत दर्शन झाल की ती लगबगीनं वरवाड्याकड येत होती. वहिनीच्या दर्शनासाठी रस्त्यावर आणि रस्त्यावरील घराच्या दारात अशीच कित्येक कुतूहल आनदी होऊन उभी दिसत होती. लेकुरवाळ्या बाया कडेवरल्या मुलाला वहिनीकडं बोट करून म्हणत,

" त्या पाहा वहिनीसाहेब ! "

चौकातल्या आडावर पाणी भरणाऱ्या कुलागना एकदम पाठीमाग वळून पाहात होत्या. एकादा पाण्याचा मोठा हडा डोक्यावर असला तरी वहिनीला पाहण्याच औत्सुक्य ओझ विसरवीत होत आणि मान वळवायला लावीत होत. वहिनी तिकड पाहात होत्या, आणि मंद स्मितान ओळख पटवीत होत्या. रस्त्याच्या बाजूला असलेल्या रिकाम्या जागी रिकामटेकड्याच्या रंगात आलेल्या गप्पा या छकड्याच्या आगमनान एकदम थाबत होत्या, आणि जो तो ताग्याकड पाहून घेत होता. वहिनी गावात नव्हत्या तेव्हा एक साथीची झडप येऊन गेली होती हिवाच्या लाटेन उभ पीक करपून गेलं होत. गावातल स्वास्थ्य आणि समाधान जामखेड रस्त्यान अस हसत परत आल म्हणजे सगळी वस्ती हरखून जात होती !

श्रद्धा आणि भक्तीन अत करणाला दृष्टि आली की चागल्याच चागुलपण चटकन् ओळखता येत त्याची ही खूण होती !

वहिनीचा छकडा वाड्याच्या दाराशी आला कीं सामानसुमान उतरून घेण्यासाठी माणस तत्परतेन धावत येत होती !

वहिनी वाड्यात आल्यावर तर तेथल्या वातावरणाला वेगळीच झाक येई !

मुख्य बैठकीत रावसाहेबाच्या समोर कुठाची गर्दी असे. पैशाच्या देवघेवीच्या भानगडी काळया पाढऱ्या करण्यात रावसाहेब गर्क झालेले दिसत. वहिनी आल्याच पाहून त्या बैठकोत काही वेगळच कुतूहल आणि आनद हेलावून जाई !

वहिनी ओसरीकड येऊ लागली की गावठी वाणान मळलेला पण वेगळपणान निवडून पडणारा 'झिपऱ्या' कुत्रा वहिनीला पाहताच जागचा उठून भुकत होता तिच्या पायाशी अग घासून उड्या मारीत तऱ्हेतऱ्हेनें अगमोड करीत ओसरीपर्यंत तिची सोबत करात होता. ओसरीवर पाय ठेवताच एक बाडी माजर तिच्या पायात घोटाळत होती आणि गोग्रास खाणारी हरणी गाय वहिनीला पाहनाच परिचयाची ललकारी फोडून वहिनीच्या हातातल्या केळीच्या पानाच्या तुकड्याकड तोड लाबवीत होतो !

वहिनीच्या आगमनान वाड्यातल्या गडीमाणसाच्या हालचालींत चैतन्य आल्यासारख दिसत होत, आणि त्याचे चेहरे आनदान उजळून निघाल्या सारखे दिसत होते !

वाड्याची झाडझूड करणाऱ्या मजुळा महारणीला वहिनीच्या गैरहजेरीत चतकोर भाकरीचा शिळा तुकडा मिळविण्यासाठी आठदहा वेळा 'बाईसाब' अशा हाका घालाव्या लागत वाड्यातल्या दुसऱ्या एकाद्या बाईसाहेबान तिला तस निष्ठन बसलेल पाहिल तर त्या म्हणत,

" अग, धरण धरूनच बसली आहेस भाकरीसाठी ! एकादे दिवशीं नाही मिळाली भाकर तर काय होत ग ? भारीच लघळ आणि लोचट जात ही ! तरी गावकीच वतन आहे...... "

मजुळा शरमेन निघून जात असे

वहिनीच तस नव्हत !

मजी दिसायला उशीर, वहिनी म्हणत होती,

" मजे ! जाताना तशी जाऊ नकोस ! भाकर ठेवली आहे ती घेऊन जा हं ! ...... "

दया, प्रेम सहानुभाव या कोमलतम तत्त्वानीच या माऊलीच्या अंत:करणाची घडण झाली होती की काय न कळे !

वाड्यांत राबणाऱ्या गडीमाणसाच्या रोजच्या वेगवेगळ्या अडचणी असत !

दिवाबत्ती आणि बिस्तर बिछाने करणाऱ्या म्हाताऱ्या महादूची जमीन रावसाहेब चौधऱ्यान फारच थोड्या कर्जाच्या वसुलीत बळकावली होती. आणि व्याजाच्या फेडीदाखल महादू वाड्यात राबत होता आणि त्याची तरुण पोरगी गजरा भाडी घाशीत होती ! एकादे वेळी दुपार कशी-बशी टळली तरी रात्रीचे काजवे फाडून खायला सिद्ध असत. घरात पुरेसं पीठकूट नसे. कधी कधी तरुण गजरेला उघाडीत उघडपणान यावयाला पुरेस वस्त्र नसे नव्या कर्जाची उचल करायला महादू तयार होता. पण तें देण्यापूर्वी रावसाहेब चौधरी गभीरपणान विचार करीत होते,

" उद्या महादू कुचकला तर रकम परत यायची कशी ? निदान थोड तरी तारण असायला पाहिजे होत ! ...... "

वहिनीखेरीज महादूच्या अडचणी दूर करायला कुणी नव्हत !

वहिनीला पाहताच राध्या (राधाकिशन) आपल्या पोटावर चापट्या मारून घेत होता. त्याला सुचवायच होत,

" माऊली ! गेलीस तेव्हापासून या पोटात काहीच पडलेल नाहीं ! आता तुझ जेवण झाल की मला चागल पोटभर वाढ ! "

वहिनी ते ओळखीत होती न् म्हणत होती,

" अरे जेवायच तर होऊ दे ! "

राध्याच्या बापाला चागली जमीन होती. ती चौधऱ्याच्या शेताला टेकून होती रावसाहेब चौधऱ्यान राध्याच्या बापाला जाळ्यात पकडलं. कांही 'काळपाढर' केल आणि त्याची जमीन आपल्या ताब्यात घेतली. राध्याचा बाप त्या धसक्यानं खलास झाला पोरका झालेला लहान आणि अज्ञ राध्या वरवाड्यातल साडपाणी भरायला आणि तागा हाकायला चौधऱ्याकडं आला

एकदा तो चांगलाच आजारी पडला. कुत्र झोपायच्या पडवींत ज्वारीची रिकामी पोती खालीं वर घेऊन राध्याला कुडकुडत पडलेला पाहून

वहिनीनं त्याची नीट व्यवस्था केली. त्याला आपल्या हातान खाऊ पिऊं घातल. आणि त्याला बर केल

'झिपऱ्या' कुत्र्याला कृतज्ञतेची अभिव्यक्ति करण्यासाठी नसलेली वाणी राघ्याजवळ होती त्यान देवाला कधी हात जोडले नाहीत. वहिनी हेच त्याच दैवत होत !

श्रीमत नानासाहेब चौधरी पक्षाघातान उजव अग गमावून आथरुणाला कायमचे खिळले होते. त्याच तें लुळ अग आणि विशेषत तो त्याचा सुप्रसिद्ध तिरळा डोळा विचित्र भीषण दिसत होता. त्याच तिरळ्या डोळ्यानं सुदरनानीच 'पाणी' हेरलं होत. राजाभाऊ देसायाचा भयानक अत पाहताना तो तिरळा डोळा जरा देखील कानाकोपऱ्यानी ओला झाला नव्हता निदान त्या वेळी तो जिवत माणसाचा डोळा म्हणतां येत होता. आतां त्या डोळ्यात प्रेताची कळा होती. आणि त्याकड पाहण्याची भीति वाटत होती ! नानासाहेबाच्या अर्ध्या अगाला असा काही जोराचा झटका बसला होता की तोड वाकड झाल्यामुळ शब्दोच्चार नीट आणि स्पष्ट करतांच येत नव्हता. 'अॅवॅव' 'अवॅव' असा चमत्कारिक अर्थशून्य उद्गार काढूनच वाटलं तर ते एकाद्याला बोलत नाही तर बोलावीत !

" वहिनी आली ! "

ही गडी माणसाची पुकार नानासाहेबाच्या कानावर जातांच त्यांना क्षणभर नवी धुगधुगी आल्यासारखी वाटत होती. कारण दिवसातून नियमान आतां एकादा तरी अन्नाचा घास तोडांत जाईल याची शक्यता निर्माण झाली होती ! सौभाग्यवती बकुळाबाईंनी आपला ग्रथ केव्हाच आटोपला होता. वहिनीखेरीज दुसऱ्या दोन धाकट्या सुना आपापल्या नवऱ्याला स्वयपाक करून खाऊ घालीत होत्या आणि स्वतः जेवीत होत्या हेंच विशेष होतं. त्यांचं नटणं, मुरडण पाक मदिरांतल्या राखेन न् धुरान धुराडून जात होत. आणि मग तें साफसूफ करायला त्यांना दिवस पुरत नव्हता. एक वेळची चूल फुकली तर सर्वांत धाकटी सून—सौभाग्यवती प्रमिला राणी—डोकेदुखी घालविण्यासाठी आठ दिवस आथरुणांत शिणून पडत होती. मधल्या

सूनबाई सौभाग्यवती रजनीदेवी एक वेळचा स्वयपाक करताना तीन चार दिवसाच धान्य सहज कचऱ्यात घालीत होत्या जवळपास कोणी असेल त्याला शिव्या देत होत्या. चूल फुकताना ' जाळ झाला ग बााई ! ' असा अर्धवट त्रासिक आणि अर्धवट रुदनाचा स्वर काढीत होत्या. स्वयपाकीण ठेवायची ऐपत नसलेल्या चौधऱ्याच्या घरात आईवडिलानी चुकून आपल्या मुली देऊ नयेत असा उपवर मुलीच्या पालकाना ओसरीवरून सदेश देत होत्या. आणि तशात रुग्णजर्जर सासऱ्याकड ताट न्यायची वेळ आली की म्हणत होत्या,

" अस चमत्कारिक दुखण कधी पाहिल नाही गऽ बाई ! आमचा जीव घेतल्या शिवाय का बर होणार आहे ते ? .. "

नानासाहेब चौधरी हे ऐकू शकत होते आणि पाहू शकत होते. त्याची श्रुति आणि दृष्टि कायम ठेवण्यात ईश्वराचा काही विशेष हेतु होता ?

रावसाहेव, दादासाहेब आणि आबासाहेब या तिन्ही मुलापैकी एकहि नानासाहेबाजवळ क्षणभर बसायला अथवा बोलायला तयार नव्हता राव-साहेबाना बैठकीतून उठायलाच वेळ नव्हता. तहसीलदार, मुनसफ, फौज-दार अशी माणस मधून मधून वरवाड्यावर येत होती रावसाहेब त्याच्या स्वागतसत्कारात आणि आदरातिथ्यात गर्क राहात होते त्याच्या सरबराईला तसा फारसा खर्च लागत नव्हता. गावातल्या कोणत्याहि दुकान्ातून तादूळ, तूप, गहू, साखर असा माल सहज आणता येत होता. अर्थात् उधार ! दुकानदाराचा नकार आला की त्याची धडगत राहात नव्हती ! पाहुणे खाऊन मस्त होत होते. सरकारी दरबारी अशा मार्गानं वजन वाढविण्याचा रावसाहेबाचा डाव यशस्वी झाला होता. ते गावा-तल्या माणसाची मालमत्ता सहज बळकावून बसत होते. कोर्ट कचेरी झाली तर मुकदम्याचा निकाल त्याच्याच बाजून लागत होता. गावातल जे जे चांगल असेल ते ते आपल्या मालकीच आपल्या उपभोगासाठी असाव या महत्त्वाकांक्षेन ते भारले होते !

श्रीमत दादासाहेब मधून मधून शिकारीला जात होते. अन् घरी असले तर वरची माडी सोडून कामाव्यतिरिक्त सहसा खाली उतरत नव्हते.

सामान्य माणसापेक्षा आपल स्थान फार वरच अहे, असा अभिमान त्याच्या ठिकाणी असल्यास न कळे! रहस्यकथा वाचायचा त्याना अलीकडं भलता नाद लागला होता!

या नादाच मूळ शोधायच झाल तर अस म्हणता येईल की, सौभाग्यवती बकुळाबाईना अखेरचा श्वास लागला तेव्हा तिघही भाऊ घाईनच धावत आले बकुळाबाई निष्प्राण झाल्या तेव्हा तिघाही भावानी त्याच्या अगावर अग टाकून आक्रोश करायला आरभ केला रावसाहेब आईच्या गळ्यावर तोड ठेवून हुदके देऊ लागले. दादासाहेबानी आईचा उजवा हात अश्रूनी भिजवायला आरभ केला उरलेला हात बिचाऱ्या आबासाहेबाना लाभला

तिघाचीहि अखेर भयकर निराशा झाली कारण बकुळाबाईंच्या अगावरचे दागने आधीच कुणी तरी लाबविले होते. त्यात अर्धांगवायूनं अधू झालेल्या नानासाहेबाचा हात नव्हता हे नक्की! दादासाहेबांनीच आईचे दागिने लाबविले असावे अस रावसाहेबाना वाटत होत दादासाहेबाना रावसाहेबाचा सशय होता. आणि रावसाहेब दादासाहेबानी काही तरी सगनमत करून दागिने पार केले असावे अस आबासाहेबाना वाटत होत जावाचा सशय वहिनीवर होता. आणि सगळाच सशयाचा गोधळ झाल्यामुळ बकुळाबाईच्या दागिन्याच रहस्य पाचपन्न स पानाच्या रहस्यकथेपेक्षाहि अत्यत गूढ आणि गहन झाल होत! रहस्यकथा वाचून दादासाहेब आईच्या दागिन्याच रहस्य उलगडणार होते की काय न कळे!

सर्वांत धाकटे चौधरी आबासाहेब पट्ट्यापट्ट्याचा चोळणा घालून आणि तसलाच अगरखा घालून सकाळी खाली आले की ओसरीच्या पायरीजवळ ब्रशान दात घासता घासता पाढरा फेस थुकत आणि चारटचा नजरेनं भाडी घासणाऱ्या गजरेकड पाहात म्हणत होते

" वेल् वहिनी! चहा तयार आहे ना?"

वहिनीला इग्रजी येत नव्हत म्हणून आबासाहेबाना आपलं हृद्गत मराठीत व्यक्त कराव लागत होत. त्याच सगळच काम विलायती अस-

त्यामुळ वडीलधाऱ्या माणसासमोर बायकोशी गप्पा विनोद करायला ते मुळीच कचरत नव्हते.

दादासाहेब मुनसफ व्हायची महत्त्वाकांक्षा बाळगीत होते आबासाहेबांना तहसीलदारी मिळवायची होती. राजधानीच्या ठिकाणी इतर जहागीरदाराचे बगले होते तसा आडगावकर चौधऱ्याचा एकहि राजवाडा नसल्यामुळ सरस्वतीच्या उपासनेत फार मोठा व्यत्यय येत होता. सरकारी यत्रणेंत अधिकाराच्या जागा मिळवू इच्छिणाऱ्या आडगावकर जहागिरदारांच्या मुलानी राजधानीचया हॉटेलात की भाडघरात राहून उपेक्षेन पुस्तकांना लागणारी वाळवी झटकीत बसायच होत? भिकार वातावरणात बृहस्पतीलाहि विद्यार्जन करण जमल नसत! राहायला चागला बगला नव्हता आणि रावसाहेब सढळ हातान पैसा पाठवीत नव्हते म्हणूनच दादासाहेब आणि आबासाहेब परीक्षेतून सुटू शकत नव्हते. तशात बायको आपल्या गैरहजेरीत आत्महत्या केल्याशिवाय राहणार नाही, या सशयान न् भयान दोघही परत येऊन वरवाड्यात शक्य तितका जास्त वेळ घालवीत होते!

नानासाहेबाची तस म्हटल तर या दोघानीच खरी दखल घेतली होती चांगली वैद्यकीय मदत मिळविण्यासाठी दादासाहेब बरीच मोठी रकम घेऊन राजधानीला आले राजधानीच ठिकाणच अस होत की तिथ खिशांत पैसा म्हणून ठरत नव्हता. 'डॉक्टर येतो आहे!' असे सांगून दादासाहेब हात हालवीत परत आले आणि त्यानी औषधासाठी नवी रकम मागितली होती. रकमेचा आकडा डोळे पाढरे करील असाच होता. रावसाहेब तेवढी रकम देतील हे अशक्य होत!

मग आबासाहेबानी प्रयत्न करायला आरंभ केला होता!

पक्षाघात, राजयक्ष्मा या सारखे रोग हिंदुस्थानांत बरे होत नाहींत, त्यासाठी विलायतेलाच गेलेल बर, अस आबासाहेबानी बोलून दाखविल होतं. खर्चाचा त्यानी हिशेब केला होता. पधरावीस दिवस जाण्याच्या तयारीत घालविले होते. रावसाहेबानी तिजोरीच कुलूप हालविलं नव्हतं

म्हणून सगळे बातबेत थंड पडले होते. आबासाहेब नाराज होऊन वडिला-जवळ जाऊन म्हणाले होते,

"पपा! पाहिलीत रावसाहेबाची वागणूक! तुमच्या उपचारासाठीं पैसे द्यावयाला तयार नाही तो! कबुतर कापून गावठी इलाज करा म्हणतो! खेडवळ! पपा, तुमच्या जगण्याचा आता काहीच उपयोग नाही! खरंच कांहीच उपयोग नाही! मानजाव् पपा! ...."

हे भाषण ऐकून नानासाहेबाना काय वाटलं असेल कोण जाणे? सुदर-नानी ज्या माडीत रहात असे आणि राजाभाऊ देसाई ज्या खिडकीतून खालीं पडले तिकड त्यांच लक्ष जाई. आणि मग ओसरीकड ते दृष्टिक्षेप करीत. जणु गतायुष्यात झाल ते होऊन गेल! त्याचाच परिणाम म्हणून मुलं अस बोलत असावेत! परतु अशाहि परिस्थितीत आपणास जगविणारी व्यक्ति वहिनीच्या रूपान ओसरीवर निश्चित वावरते आहे, अस तर त्यांना वाटत नसाव?

वहिनी अशी सर्वप्रिय असली तरी जावाच्या द्वेषाचा धूर तिची सर्व-प्रियता मळवू पहात होता. घरातल हाताला येईल तेवढ ओढण्याची आणि छपवून ठेवण्याची त्याची प्रवृत्ति होती त्याना भारीची लुगडी हवी असत त्याना चागले अलकार लागत. मनासारख सर्व काही मिळालं तरी त्या कुढत आणि लहान सहान गोष्टीवरून भाडण काढून रडत, नाहीतर कलहान चेतलेली अबोल्याची धुनी फुकीत बसत! म्हणूनच चौधऱ्याच्या वरवाड्यात गृहिणीचा कलरव ऐकू येण्याऐवजी कलहाची कलकल मात्र कानी पडत होती!

गांवातल्या दोन तीन प्रतिष्ठिताच्या घरी हळदीकुकवाचं निमत्रण होत. दुपारी दोन वाजल्यापासून रजनी देवी आणि प्रमिलाराणीचं नटणं थटणं चालू होत. दादासाहेब अर्ध्या अगावर पाघरूण ओढून गुप्त पोलिसांच्या कथेच्या वाचनांत निमग्न होते. मुन्सफ होणाची इच्छा करणाराला खून,

पोलीस आणि त्याच गोप्य वाचून काढण भाग होतच. वाचनात गढल्या-मुळ सजलेल्या पत्नीकड पसतीची दृष्टि टाकायला आणि जाभई देऊन दोन्ही हात आव्हानाच्या आवेशात पसरायला त्याना सवड नव्हती तीन-तीनदा आरशात पाहून अगमोड करणाऱ्या रजनीदेवी म्हणत होत्या,

" काय मेला वाचनाचा नाद ! "

मग दादासाहेबानी पुस्तक बाजूला करून एक क्षणभरच रजनीदेवीकड पाहिल ! 'वा ! छान ! ' असा निव्वळ कोरडा अभिप्राय व्यक्त करून पुस्तक डोळ्यापुढ धरल आणि ओलाव्यासाठी मग स्वत. रजनीदेवीनच तोडाजवळ तोड नेण्याचा प्रयत्न केला

आबासाहेब पत्नीला मदत करीत होते बायकोच्या चेहऱ्यावर आपल्या हातानच ते पावडर चढवीत होते आणि तळहातात धरलेल्या तिच्या चेहऱ्याची अबड झिबड करून सगळी शोभा उडवून लावीत होते.

प्रमिलाराणी पुन्हा प्रारभापासून आरभ करीत होत्या !

उन्ह उतरायच्या सुमारास वहिनीची हाक आली, तेव्हा त्या दोघी खाली आल्या, वहिनीच्या पुढ राजस्नुषेच्या डौलात चालू लागल्या आणि परत आल्या त्या अतिशय आबट चेहरा करून ! कारण घरोघर वहिनीचच अधिक अगत्यान स्वागत झाल अस त्याना वाटल होत !

वहिनीन एकहि अलकार अगावर घातला नव्हता आणि म्हणूनच की काय नट मोगऱ्या जावाच्या जोडीला जातीची सुदर आणि सात्त्विक असलेली वहिनी स्वागताला योग्य ठरली होती !

रजनीदेवी आणि प्रमिलाराणीन घरी आल्यावर वहिनीच्या साधे-पणावर भाष्य केलं होत,

" मोठी लबाड ही सटवी ! साध्या वेषात आपल्याबरोबर यावयाचा तिचा केवढा खोल हेतु होता ! चौधऱ्याच्या धाकट्या सुनाना दागिन नव्हते, होत ते सार थोरल्या सुनेच, अस लोकाना भासवाव ! चहाटळ...... "

वहिनीन अगावर दागिन्याच सगळ लगर घातल असत तरी त्या दोघी नाराज झाल्या असत्या असतुष्ट व्हायला त्याना आणखी एकाद नव कारण सहज आढळल असत.

मुका मार लागल्या प्रमाण दोघीहि जावा आपापल्या खोलीत आथरुणा-वर धुमसत पडल्या. ओळखीचे हात अगावर आले ते त्यानी झुरळासारखे झटकले. पुरुषी विचारपूस योग्य त्या प्रमाणात सुखदोष्ण झाली आहे असं दिसताच प्रथम त्यानी हुदका दिला आणि मग म्हटल,

"तरी मी म्हणत होते नको इथ राहूण म्हणून !"

वहिनीन रात्री प्रत्यकीच्या खोलीच दार खडखडविल न म्हटल,

"अहो बाई ! जेवायला चला ना !"

"तुम्ही घ्या जेवून ! मला भूक नाही !"

या साध्या उत्तराला तिरसटपणाची जी धार होती ती वहिनीला बोचल्याशिवाय राहिली नाही !

म्हाताऱ्या महादूची तरुण पोरगी गजरा वाड्यात भाडी घासायला आली की बेचैन होत होती, आणि वाड्यातली बेचैनी वाढवीत होती ! गुप्त पोलीसाच्या भानगडीत गर्क होणारे दादासाहेब जेवायच झालय की नही, हे पाहण्यासाठी उगीच एकदोन वेळा ओसरीवर येऊन जात होते. आणि अपुऱ्या वस्त्रातल्या, श्रमान अधिकच राकट आणि घोमदार दिसणाऱ्या गजरेच्या अगावर जाता जाता नजरेची क्षत करून जात होते आबासाहेब तोडान शीळ घालीत एकादी इग्रजी चाल आळवीत खिडकीतून पहात होते. भक्ष्यासाठी दबा धरून बसलेल्या माजरासारखी सावधगिरी ठेवून ते सधि शोधीत होते.

अखेर दादासाहेबानी गजरीला एकट गाठल. ती चळचळ कापूं लागली. दादासाहेबानी तिच्या निशब्दतेला घायाळ करून टाकल ! वहिनीला ते समजताच गजरीन तिचे पाय धरले न् म्हटल,

"वैनी ! "

तिला काहीच बोलता आल नाही.

दुसऱ्या वेळी आबासाहेबानी तिला प्राप्त करून घेतल न् मग पैशाच्या मोहान गजरा आबासाहेबानतर थेट रावसाहेबाच्याहि स्वाधीन झाली !

गजरीला झाकण्याचा वहिनीनं कितीही प्रयत्न केला तरी वाड्यातली प्रवृत्ति चागल तेवढ मळवून टाकल्याशिवाय राहणार नाही, हे वहिनीला समजून चुकल

तिन दादासाहेबावरून गजरीच्या सबधात काही उद्गार काढल्याची गुण गुण लागताच रजनीदेवीन मुक्ताफळ उधळली,

" आमची माणस अशी नाहीत ग बाई ! मणभर मळ सांचलेल्या त्या मजूरणीच्या अगाशी हे कशाला झटायला जातील ! काही तरीच ! तिच्याच (वहिनीच्या) नवऱ्याला अशी शेण खायची सवय आहे. ही बया कोणाविरुद्ध केव्हा काय किटाळ उठवील काही सागता येत नाही ! अन् हिलाच आग आहे म्हणून तर रात्री अपरात्री जेवणाच निमित्त करून आमच्या माणसाची दार ठोठावते ही ! आम्ही वाड्यात राहू नये अशाच मेलीच्या आता कारवाया चालू आहेत. . "

मग काही हुदके निघाले पालथ पडून उशीत तोड घुसळणं झाल आणि दादासाहेबानी तिला उठविण्याचा प्रयत्न केला तेव्हा काठोकाठ भरलेल भाड अधिकच हिसळू लागल.

वहिनींनं ते सार ऐकल. कावळ्याला चिमणी म्हणणाऱ्या पोरकट अज्ञानावर हसण्याखेरीज आणखी काय करता येणार ?

वहिनीच साऱ्याच गुलाबाच फूल रजनीदेवीनं एकदा सहज घालायला म्हणून घेतल आणि ते आपल्या दागिन्याच्या पेटीत कायमच जमा करून घेतल.

देवीच्या दर्शनाच्या निमित्तान कोल्हापुरी जाऊन येताना रावसाहेबानी मुद्दाम ते वहिनीसाठी आणल होत. जहागीरदारणीन गावातल्या समारभाना जाताना उची पोशाक करावा आणि इतर अलकाराबरोबर ते फूलहि घालाव अशी त्याची नेहमी सूचना असे. अशाच एका प्रसगी ते दिसल नाही तेव्हा रावसाहेबानी चौकशी केली

वहिनीन उत्तर दिल,

" रजनीबाअीनी घालायला घेतलं आहे ! "

"हूऽ!"

ते ऐकताच रावसाहेबानी एक दीर्घ हुकार सोडला.

रजनीदेवी ते गुलाबाच फूल सहजासहजी परत करण्याइतकी भोळी नव्हती किंबहुना दोन्ही भावजया आपल्या पत्नीपेक्षा फार चतुर आणि आतल्या गाठीच्या आहेत हे रावसाहेबाना केव्हाच कळून चुकल होत!

वहिनी अतिशय भोगळ होती आपल्या कपडचालत्त्याच्या आणि दागदागिन्याच्या पेटीला ती सहसा कुलूप लावीत नव्हती ती दागिने अंगावर घालीत नव्हती तशी नीट जपूनहि ठेवीत नव्हती!

रावसाहेबानी एखादा अलकार हौसेन आणला तर त्याच्या समाधानापुरता क्षणभर ती अंगावर ठेवी. तो देखील बेफिकीरीन! ती त्याला पुन पुन्हा चाचपून पहात नव्हती चार चौघींनी त्याकड पाहाव आणि त्याच कौतुक कराव अस काही करीत नव्हती रावसाहेबाची नजर त्यावर सारखी आदळावी आणि तिन नजरेनच काही गूढ मधुर बोलाव अस रावसाहेबाना जे वाटत होत ते तिच्या लक्षातहि येत नव्हत!

नाही म्हणायला तो अलकार दुसऱ्या दिवशी गादीच्या कोपऱ्यावर किंवा न्हाणीघरातल्या नाहीतर ओसरीवरल्या एखाद्या कोनाड्यात तसाच पडू देत होती! स्त्रियामधली नटण्याची सामान्य हौस तिच्या ठिकाणी नव्हतीच काय? तिन रोज एक नवा अलकार आणायला सागितला तरी घरातल्या तिजोरीत हात घालून किंवा गावातल एखाद घर जाळून रावसाहेब तो तिला आणून देण्याइतके समर्थ होते! ती तर आपणहून काहीच मागत नव्हती मग आपल्याच समाधानाकरता आणि चित्त प्रसन्न ठेवण्यासाठी तिला काही आणून द्याव तर ती खुशाल जावाच्या स्वाधीन करीत होती!

तरुण वयात ही एवढी उदास का?

काय, रावसाहेबाच्या अनिर्बंध वर्तनावर ती नाराज होती? त्या नाराजीत रावसाहेबाच्या दृष्टीन काहीच अर्थ नव्हता. सहज कुठ डोळा गुतला आणि मन ओढल गेल की ते आवरायला रावसाहेब तयार नव्हते. ते आडगावचे चौधरी होते! एखाद्या कृपणाच जीवन त्याना घालवायच

नव्हत. ते स्त्रियाच्या नादी लागत होते तशा स्त्रियाहि त्यांच्या भजनी लागत होत्या त्याचा तो भरदार उंच बांधा स्त्रियाच्या अनुरक्तीचा विषय व्हावा यात त्याना केवढी धन्यता वाटत होती. पण म्हणून रावसाहेबाचं आपल्या पत्नीवरच–वहिनीवरच–प्रेम कधी कमी झाल होत काय ?

कुठं फलाहार अथवा पेय झाल तरी घरी जेवणाची भूक ठेवूनच ते येत नव्हते काय ?

वहिनीला हे वर्तन मुळीच पटण्यासारखं नव्हत सतरा ठिकाणी तोंड उष्टावून केवळ मुखशुद्धीच्या निमित्तानं घरी प्रकट होणाऱ्या पुरुषी प्रेमाचं स्वागत करायला लग्नाच्या स्त्रीनं औत्सुक्य आणि उत्कटता कुठून आणावी ?

एकदा रावसाहेबानी वहिनीसाठी एक नवाच अलंकार करून आणला. तो तिला केव्हा दाखवीन अस त्याना होऊन गेल. कामधामाच्या रगाड्यात ती गुंतली होती आणि गडी माणसाचा तिजभोवती गराडा पडला होता. त्यातून तिची केव्हा सुटका होणार होती कळत नव्हत. शुक् शुक्चे पोरकट इशारे करून तिला बोलावून घेणहि योग्य दिसल नसत. रात्री तांब्याभांडं घेऊन वहिनी आली तेव्हा रावसाहेब तिला म्हणाले,

" फार लवकर आठवण झाली आमची आज! "

" त्यात लौकर न् उशिरा कसल ? काम संपल...... "

आपण एवढा रम्य गर्भितार्थ असलेल वाक्य उच्चारल, आणि ते तिला मुळीच समजल नाही म्हणून रावसाहेबाना पत्नीच्या अरसिकतेची कीव आली आणि विषाद वाटला कदाचित् दिवसभराच्या कामानं शिणल्यामुळं तिच्या वृत्ति प्रसन्न नसाव्या अस वाटून रावसाहेबानी तिचा हात धरून तिला जवळ बसविल. एका पातळ कागदाच्या पुडीतून फार नाजूक आणि अतिशय सुबक घडण असलेली एक सोन्याची माळ काढली आणि तिच्या गळ्यात घातली

माळेचे पदर वहिनीच्या गळ्यात झळकू लागले! ती पाहतांच 'किती हो तुम्ही चांगले' अशा अर्थाचं एकादं 'रसभरेल' वाक्य उच्चारून पत्नीनं चटकन् गळ्यात बाहूची माळ गुंफायला हवी होती, म्हणजे त्यांच्या

त्या वेळच्या मन स्थितीला आणखी मधुर उत्तेजन मिळाल असतं, अस राव-साहेबाना वाटल

पण तस काही झाल नाही.

मग रावसाहेबानी म्हटल,

"उद्या ही माळ देऊन टाक कुणाला, नाहीतर दे फेकून एकाद्या कोना-ड्यात आणि माझ्या हौसेचा चोळा मोळा करून टाक!"

रावसाहेबाच ते म्हणण खरच ठरल!

दुसऱ्या दिवशी ती माळ वहिनीच्या गळ्यात दिसली नाही

दुपारी पाटावर बसल्यावर, जेवताना आणि पाण्याचे घोट घेताना रावसाहेबाची नजर पुन पुन्हा वहिनीच्या गळ्याकड जात होती जेवायला एक पाहुणे असल्यामुळ काही बोलता येत नव्हत वहिनीच्या ते लक्षात येताच तिन राध्याला बोलावल न् म्हटल,

"राध्या न्हाणीत माझी माळ राहिली आहे तेवढी आण रे!...."

"वा रे शहाणी!"

अशा अभिप्रायान रावसाहेबानी वहिनीकड पाहिल.

न्हाणीच्या कोनाड्यात माळ नाही अस कळताच रावसाहेबानी जव-णाचा हात आखडला ते पानावरून उठले पाहुणा बैठकीकड सरकला अस पाहून रावसाहेबानी हातांतला तांब्या ओसरीवर भिरकावून राध्याला म्हटल,

"राध्या! माळ सापडलीच पाहिजे! नाहीतर एकेकाला फुकून टाकीन! घरातल्या बाया तरी किती गाढव! ए! म्हाद्या कुठय् तो थेरडा? आण बोलावून त्याला! अरे कुणी माझी बदूक आणा!...."

नौकराखेरीज ती माळ जाणच शक्य नव्हत! ज्या घरी अन्न खाव-याच तिथ चोरी केल्याशिवाय नौकराना राहवत नव्हत की काय कोण जाणे!

बदुकीच नाव ऐकताच माळेच प्रकरण फार गभीर आणि भयानक होणार अस वहिनीला वाटल. नौकर वर्गाला मारहाण होऊन वाड्यात नसता गोधळ होणार होता. वहिनी रावसाहेबाजवळ येऊन म्हणाली,

"असेल ती माळ कुठ तरी! त्यासाठी बदुकी न् भाले कशाला आणायचे ?"

वहिनीच्या या वाक्यान तर रावसाहेब अधिकच सतापले पण काहीच न बोलता आल्यामुळ तिथून चालते झाले. पण जाताना त्यानी राध्याला धमकी दिली,

" सध्याकाळपर्यत माळ सापडलीच पाहिजे! ...."

त्या धमकीचा रोख थोडासा वहिनी कडेहि होता की काय न कळे!

ओसरीवरल्या या गोधळाची वाड्यातल्या माड्या खिडक्याना कल्पना नसावी! वातावरण जरास थड झाल्यावर, रजनीदेवीन न्हाणीतून काही तरी वर नेल अशी एक बातमी लागली वहिनी त्याच्या खोलीत गेली तेव्हां रजनीदेवी आरशात पहात माळ गळ्यात चाळवीत बसल्या होत्या. वहिनीन ते पाहिल आणि म्हटल,

" तुम्ही आणलीत होय माळ ? खाली केवढा गोधळ व्हायला आला होता! बर झाल आणलीत ती! नीट जपून ठेवा ह! ...."

" माळ ? कुणाची माळ ? मी नाही घेतली बाई कुणाची माळ! .."

रजनीदेवी थोडस चाचरल्या आणि आपले 'काळे हात' झाकण्याचा त्यानी प्रयत्न केला

" अहो अस काय करता ? ती गळ्यात आहे ना!"

" वा! वा! बऱ्याच आहा की बाई! अहो ही माझ्या माहेरची आहे! ...."

वहिनी क्षणभर सर्द झाली

स्वत ची बाजू भरीव असूनहि काही माणसाची मन स्थिति प्रसगी अकारण दुर्बल होते साधुवृत्तीच्या वहिनीला वाटल,

" आपल चुकल तर नाही ?"

हा सवाद रावसाहेब मुद्दाम ऐकत होते. ते पुढ येऊन म्हणाले,

" पाहू ती माळ! "

रजनीदेवीन मानेवरल हुक काढून ती माळ रावसाहेबाकड भिरकावली. रावसाहेबांनी ती उचलली. एकाच दिवसात माळेच्या ताजेपणाचा तिच्या घडणीचा आणि हुकाजवळ असलेल्या सुवर्णकाराच्या विशिष्ट खुणेचा रावसाहेबांना विसर पडण शक्य नव्हत. ते म्हणाले,

"हीच ती माळ!"

रजनीदेवीन मोठ्यान गळा काढला, आपले सगळे दागिने रावसाहेबापुढ भिरकावले आणि आजच्या आज तिला माहेरी पोचविल नाही तर विहिरीत उडी टाकून जीव देण्याची धमकी दिली! शिकारीला गेलेले दादासाहेब दारांत दिसताच रजनीदेवीनं त्याच्या गळ्याला मिठी मारली आणि रावसाहेब अत्याचारासाठी अंगावर येत होते अस हुंदके देत सांगितल!

शिकार न मिळाल्यामुळ दादासाहेब आधीच रागात असावे. वहिनीकड पाहात ते म्हणाले,

"वहिनी! तुझ्या रावसाहेबाला घरातली माणसहि ओळखू येईनात का आता!"

या विचित्र प्रसंगान गांगरून गेलेली वहिनी कोरड्या पडलेल्या आवाजात काही खुलासा करू लागणार इतक्यात रावसाहेब पुढ होऊन म्हणाले,

"ए गाढवा! बायकोच्या शब्दावर विश्वास ठेवण्याइतका आंधळा केव्हापासून झालास?"

"नको ग बाई आता या वाड्यात राहण!"

रजनीदेवीन दादासाहेबाना या वाक्यातून पुढ काय कराव याची सूचनाच केली की काय कोण जाणे!

दादासाहेब म्हणाले,

"आजच्या आज मला इस्टेटीची वाटणी मिळाली पाहिजे! मी अशा घरात......"

"इस्टेट तुझ्या बापानं कमावलेली नाही!"

"माझा हिस्सा घेतल्याशिवाय मी तुझ्या बापालाहि सोडणार नाही!"

अर्ध अग साबूत असलेल्या नानानाऱ्हेवा-या कानी हा सवाद पडत होता

मग अर्धा पाऊण तास वाड्यात अपूर्व गोधळ झाला बापाच्या उल्लेखानतर आईचाहि उद्धार झालाच मग वदुकी परस्परावर रोखल्या गेल्या आवाज उच झाले त्यात स्त्रियाचा रुदनस्वर मिसळला वाड्यात येऊन भाडण सोडवायची कुणाची तयारी नसावी पाहुणा थक्क होऊन बसला होता. कुणाची कड घ्यावी, हे श्रीमत आबासाहेबाना समजत नव्हत !

गाळीबार झाला नसला तरी शिवीगाळ बराच वेळ होत राहिली. या सगळ्या प्रसगाला आपणच कारण आहो अस वाटून वहिनी ओसरीवर रडू लागली. जरा वेळान ती उठली दादासाहेबाच ताट तिन तसच झाकून ठेवल होत तिन त्याना जेवायला बोलावल त्या घरात अन्न घ्यावयाच नाही, असा आपला निश्चय दादासाहेबानी बोलून दाखविला आणि मोठ्या पहाटेस दादासाहेबानी पत्नीसह वाडा सोडला !

उजेड झाल्यावर वरवाड्यात बातमी पसरली,

'वहिनीचा दागिन्याचा डबा दादासाहेबानी न् रजनीदेवीन लाबविला!'

ते ऐकून रावसाहेबाच्या सतापाला काहीच सीमा राहिली नाही त्यानी वहिनीच्या श्रीमुखात भडकावली

ती असहाय आणि प्रतिकारशून्य असली तरी तिची सहनशीलता एवढी अपार होती की तिथ सगळी सामर्थ्य नम्र होत होती !

वहिनी या प्रसगापासून थोडीशी आजारी झाली अतर्गृहातले व्यवहार त्यामुळ थोडेसे विचकटल्यासारखे दिसू लागले जेवण खाण्याचे कार्यक्रम नीट आणि वेळेवर होईनात. प्रमिलाराणीना कामधाम पाहाण अत्यावश्यक झाल त्या चूल फुकून बेजार होऊ लागल्या. धुरान त्याचे डोळे लाल झाले त्या भाड्याची आदळआपट करू लागल्या एकाद लहानस भाड इकडून तिकड उचलून ठेवायच झाल तर ते उचलताना आणि ठेवताना मोठा श्वास टाकू लागल्या. आणि म्हणू लागल्या,

" मेले गऽ बाई ! "

'सटवी' 'टवळी' या उपपदाखेरीज त्या वहिनीविषयी कधीच बोलत नव्हत्या आता तर त्या शब्दाचा वापर पुन पुनः होऊ लागला. वहिनीन मुद्दाम दुखण काढल होत ! रजनीदेवीन तिचे दागिने लाबविले नव्हते का ? दागिन्यासाठी प्राण टाकणारी वहिनीसारखी बाई प्रमिलाराणीन कधीच पाहिली नव्हती ! कदाचित् प्रमिलाराणीन घरातून निघून जाव म्हणून तर हे ढोंग नव्हत ? पण प्रमिलाराणी रजनीदेवीसारखी ग्डकी न् घर सोडून जाणारी नव्हती ! तशी वेळ आलीच तर ती प्रथम वहिनीला घराबाहेर काढणार होती न् मग वाटल तर ती स्वत च जाणार होती !

पण अखेर एके दिवशी तिलाच घराबाहेर पडाव लागल !

राजधानीहून जहागिरदाराच्या नावाच्या काही नोटीशी आल्या श्रीमत आबासाहेब चौधऱ्यानी राजधानीच्या ठिकाणी बरचस कर्ज करून ठेवल होत ते फेडायची मुदत सपली होती वेळ टळल्यावर सरकारी मार्ग अवलबिले जात होते रावसाहेबानी आबासाहेबाना बोलावून घेतल न् त्या नोटिशी त्याच्या पुढ फेकून त्याचा खुलासा विचारला

आबासाहेबानी नोटिसीवरून एक नजर फिरविली आणि त्या परत रावसाहेबाकड भिरकावीत म्हटल,

" सगळा मूर्खाचा कारभार ! "

रावसाहेबाना या उद्गाराचा बोध झाला नाही त्यानी विचारलं,

' म्हणजे ? आहे तरी काय ? "

एकाद्या गूढ घटनेच मूळ आपणास कळल अस दर्शविणारी चर्या करून आबासाहेब म्हणाले,

" ही सगळी त्या सावरागची लुच्चेगिरी आहे ! तरी मी त्याना आधीच बजावल होत की, जहागिरदाराच कर्ज पिढ्यानुपिढ्या चालत असत. कर्ज हे परपरागत चालत आलेल्या मोठेपणाच भूषण असत, एवढ्यातच वसुलीची गडबड ठीक नाही पण नाही ऐकल त्यानी ! "

" कर्ज घेतलस हे खर तर! "

" अर्थात! "

" दर महिन्याला एथून येणारी रकम कोणत्या खर्चात आटत होती? "

" खर्चाच काही विचारू नकोस, रावसाहेब! विद्यासपादन ही साधी-सुधी गोष्ट नाही त्यातल्या त्यात तहसील दारी मिळविण्यासाठी लागणार शिक्षण सपादन करण म्हणजे सामान्य गोष्ट नव्हे! ......"

या मूर्खाशी बोलण्यात काहीच अर्थ नाही अस समजून रावसाहेबानी ते सगळे कागद घेतले रागात जाऊन वडिलापुढ आदळले आणि सगळा वृत्तान्त सागितला. आबासाहेबहि त्याच्या पाठोपाठ आले आणि वडिलाना म्हणाले,

" पप्पा! तहसीलदारीच शिक्षण म्हणजे पाणी भरण्याइतक सोप आहे अस रावसाहेबाला वाटत. ते मी त्याला कस समजावून सागू ? "

" मला सगळ समजलय! काही समजावून सागू नकोस! यापुढ शिक्षण वगैरे सगळ बद! ...."

" ऐकलत ना पपा! केवळ रावसाहेबाच्या इच्छेप्रमाण आम्ही आमचा जीवनक्रम घालवायचा? अस कस होईल? मला तहसीलदार झालच पाहिजे! आजच्या खर्चाकड तू पहातो आहेस रावसाहेब! पण पुढल्या उत्पन्नाचा. ."

" तुझ्या बाताना मी कटाळलो आबासाहेब! तुझ्या शिक्षणाच तू पाहा आता! ....

" मी तर पाहतोच आहे! मला माझा शिक्षणक्रम पूर्ण केलाच पाहिजे! "

" म्हणजे, तू पुन्हा नव कर्ज काढणार? "

" तुम्ही पैसे न दिले तर मला हाच मार्ग स्वीकारावा लागेल! "

" ठीक आहे! मी पाहातो कोण तुला कर्ज देतो ते! " अस म्हणून रावसाहेब सतापून जाऊ लागले अणि आबासाहेब छद्मी हास्य करू लागले!

रावसाहेब गावी गेले आहेत अशी सधि पाहून आबासाहेबानी पत्नी-सह तिच्या माहेरी मोर्चा वळविला रावसाहेब परत आले तेव्हा नानासाहेब

'अॅवव्' असा अर्थशून्य पुकारा करीत होते. आणि उशाकड बोट दाखवीत होते त्या करपल्लवीचा उलगडा व्हावयाला बराच वेळ लागला. बकुळाबाईचे दागिने नानासाहेबानी उशाशी ठेवले होते त्याचा आबासाहेबाना कसा कोण जाणे पत्ता लागला होता आणि जाताना त्यानी ते लाबविले होते. एवढच नव्हे तर रावसाहेबाच्या तिजोरीवरहि त्यानी चागलाच हात मारला होता !

रावसाहेब केवळ बदूक चालविण्याशिवाय आणि शिव्या देण्याशिवाय काहीच करू शकत नव्हते ! मग त्याच्या शिव्याचा ओघ वहिनीकड वळला होता. रावसाहेबाच्या गैरहजेरीत घरात इकड तिकड पहायच कर्तव्य तिनं नीट बजावल नव्हत!

वहिनी बरी झाली आणि वरवाड्यातल्या अतर्गृहातले सगळे कारभार ठीकठाक चालू लागले. या घटनेन राध्याच्या डोळ्यात आनदाश्रू आले वहिनीन लौकर बर व्हाव अस त्याला उत्कटतेन वाटत होत प्रमिलाराणीचे सतरा प्रकारचे हुकूम ऐकून आणि त्याची अमलबजावणी करून तो वहिनीच्या खोलीत डोकावत होता तिला काही विचारता येत नव्हत कारण जे विचारायच ते कोणत्या भाषेत आणि कस विचाराव हे त्याला समजत नव्हत. निशब्दतेचा असा एक कोट वहिनीन तयार केला होता की तिथ सहसा कुणालाच प्रवेश मिळत नव्हता नुसत पाहून घ्याव आणि मनोमन तिच्या बर होण्यासाठी प्रार्थना करावी याखेरीज राध्याला काय करता येणार ?

वहिनी बरी झाली तेव्हा राध्यान धाडस करून, आपल्या रागड्या भाषेत विचारलं,

"वैनी ! आता सवत (वेगळ) राहीन म्हणतो !"

"का रे बाबा ! कटाळलास आम्हाला ?"

"तस नाही ग ! पण...."

खर म्हटल तर वाड्यात आता राहण्याची काही चव नव्हती. चौधऱ्यानी तरी राध्याला आता किती दिवस पोसायच होत ? तशात गावातल्या माणसाकडून त्याला जी जाणीव करून देण्यात आली होती ती त्याच तरुण रक्त उसळविणारी होती !

राध्याची शेत चौधऱ्यानी आपल्या मालकीची करून टाकली होती राध्याला ती आता परत मिळण अशक्य होत. राध्यान आता तरी सावध व्हायला नको होत काय ?

हे सार बोलून दाखवून वहिनीला दुखविण ठीक नव्हत त्यान वहिनीची परवानगी घेतली आणि आशीर्वाद मिळविला मग त्यान खऱ्या अर्थान 'घर' केल लग्नाला थोडासा पैसा कमी पडला तो वहिनीन त्याला दिला. नवरी घेऊन वहिनीच्या पाया पडण्यासाठी तो वरवाड्यावर चढला. वाड्यात प्रवेशल्यावर बैठकीत बसलेल्या रावसाहेबाना वदन करण भाग होत राध्यान बायकोला बरोबर घेऊन त्याच्या पायावर डोक ठेवल

वहिनीच्या शब्दात, दृष्टीत जे कल्याणकारी भाव होते ते रावसाहेबाजवळ शताशानहि आढळले नाहीत !

रावसाहेबानी नुसता हुकार सोडला त्यात तुच्छता होती की वदन पोचल्याचा अभिप्राय होता हे नक्की सागता येण्यासारख नव्हत. आणि मग नव्या वस्त्रात अधिकच आकर्षक दिसणाऱ्या राध्याच्या बायकोच अगोपाग अविचल दृष्टीन चाचपून पाहण्याचा रावसाहेबाचा कामुक आणि खोडसाळ प्रयत्न चालला होता !

एका दुपारी सगळ कामधाम आटोपून वहिनी ओसरीवर बसली होती राध्या आला आणि म्हणाला,

" वैनी चल लवकर ! गाडी तयार आहे. तुला न्यायला आलो आहे ! "

त्याच्या निमत्रणाची ती विचित्र तऱ्हा हसू आणण्यासारखी होती

वहिनीन विचारल,

" कुठ रे बाबा ? "

" माझ्या शेतात ! हुरडा खायला ! "

" माझ्या शेतात " हे शब्द राध्यान फार अभिमानान उच्चारले होते [illegible] वाटचान त्यान एक शेत केल होत धरतीन राखलेला पान्हा राध्यासाठी जणु पुरेपूर अरू दिला होता राध्याच्या शेतातला कणसाचा आकार सागताना मागणारे ओजळीसारखे हात करून म्हणत होते,

" अस सपाटचा कणीस आहे एकेक ! "

ते खर होत !

वहिनीचे उपकार फेडावे अस नसल तरी तिन एकदा शेतात पाय ठेवला की पीक आणखी आडमाप आणि भरमाप झाल्याखेरीज राहणार नाही, अस त्याला वाटत होत

गाव रावसाहेबाच्या बऱ्यावर नव्हत गावातली एकहि नजर राव-साहेबाकड आदरान पाहात नव्हती रावसाहेब दिसताच कुलवती आडवसा करीत होत्या कुलवान् वदनासाठी हात उचलायची वेळ येऊ नये म्हणून रावसाहेबाना पाहून तोड वळवीत होते वाड्याभोवती द्वेष आग धरतो आहे याची रावसाहेबाना जाणीव होती पण तहसीलदार, मुन्सफ, फौज-दार असे राज्ययत्रातले महान् सामर्थ्यशाली मोहरे ते हाती धरून असल्या-मुळ या द्वेषाच त्याना भय वाटत नव्हत, तशात अलीकड हातात ते नेहमी बदूक वागवीत होते तिच्या साहाय्यान आडगावातली सगळी मालमत्ता ते आपल्या मालकीची करणार होते. आणि सगळ्या विरोधाना दडपून टाकणार होते !

राध्या एकाकाळचा त्याचा नौकर ! त्यान स्वतत्र रीतीन शेतीभाती करावी ही गोष्ट रावसाहेबाना आवडली नव्हती वहिनीन त्याच्या शेतात हुरडा खायला जाव, ही गोष्ट तर रावसाहेबाना मुळीच मानवण्यासारखी नव्हती !

वहिनीला हे ठाऊक असल्यामुळ ती म्हणाली,

"आलें असते रे राध्या! पण घरी पाहिलस ना कस आहे ते! ...."

तिन नानासाहेबाच्या खोलीकड बोट केल नानासाहेबाचा आजार अलीकड वाढला होता. आणि त्याना तशा अवस्थेत घरी सोडून जाण गृहिणीला शोभण्यासारख नव्हत!

राध्याला ते पटल असाव. तो म्हणाला,

"बर मग अस कर, हुरडा भाजूनच पाठवून देतो खाशील की नाहीं? ...."

वहिनीचा होकार ऐकून राध्याला बर वाटल.

दिवेलागणीच्या सुमारास राध्यान हुरडा आणि टहाळाच्या जुड्या ओसरीवर आणून ठेवल्या जरा वेळान रावसाहेब घरी आले त्यानी हुरड्याची आणि टहाळाची सहज चौकशी केली राध्याच नाव ऐकताच ते खवळून म्हणाले,

"राध्या एवढा माजला आहे का आता? आपल मोठेपण आम्हाला दाखवू लागला आहे होय? पण घेणारान तरी ते पदार्थ कशाला ठेवून घ्यावे?. "

शेवटचा टोला वहिनीवर होता

वहिनीन सगळा टहाळ आणि हुरडा गायीपुढ ठेवायला सांगितला.

राध्याला लौकरच आपल्या अतिक्रमाच प्रायश्चित्त मिळाल!

राध्याच्या शेताशेजारीच रावसाहेबाच शेत होत एका सकाळी पचनामा झाला चौधऱ्याच्या शेतातून रात्री कणस चोरीला गेली होती, ती सकाळी राध्याच्या खळ्यावर आढळली. चोरीला वेगळा पुरावा काय पाहिजे होता? मग रिपोर्ट झाला जवळच्या ठाण्यावरल्या रावसाहेबांकड नेहमी खायला प्यायला येणाऱ्या फौजदारान एका पोलिसाकरवी राध्याला हातकड्या घालून ठाण्यावर नेल रीतसर खटला सुरू झाला. तेव्हां सरकारी वकिलान घसा कोरडा करून राध्याचा अपराध साबीत केला. सुगीच स्वप्न पाहणारा राध्या तुरुगातल्या खिडकीतून चादण्या

मोजीत बसला. रावसाहेबानी त्याच्या मेहनतीची धान्याची रास आपल्या वाड्यात आणून साठविली आणि मग तर त्यानी राध्याच्या काळजालाच हात घातला !

आपल्या माडीच्या खिडकीतून खालच्या एका विशिष्ट घराकड ते पाहू लागले त्या घरातल्या तरुण स्त्रीला खिडकीतल्या नजरेची काही कल्पना नसावी तिच उन्हातल स्नान आणि तिच उघाडीतल वस्त्र बदलण केवढ्या कामुक दृष्टीन पाहिल जात होत !

ती तरुण स्त्री राध्याची बायको होती आणि तिला उघड पाहिल्यापासून रावसाहेब तिच्या प्राप्तीची लालसा उबवीत बेचैन झाले होते !

एका दुपारी घरात कुणी नाही अस पाहून रावसाहेबानी वहिनीची एक नवी साडी राध्याच्या अगणात फेकली आणि आता पुढ काय होत याची ते वाट पहात थाबले

ती साडी पाहून राध्याची बायको घाबरली. साडी वरच्या खिडकीतून पडली होती हे नक्की ! कणस चोरल्याच किटाळ येऊन राध्या अद्याप कैदखान्यात होता. या साडीन आणखी एकादी आळ येणार की काय, या भयान राध्याच्या बायकोन ती साडी उचलली आणि परत करण्यासाठी ती ज्या माडीतून पडली त्या माडीत आली वहिनी तिथ असेल अशी तिची कल्पना !

दाराआड लपलेल्या रावसाहेबानी गळाला लागलेला मासा हाती येताच आजारून गोजारून पाहायला आरभ केला सुदैवान की दुर्दैवानं कुणाला माहीत वहिनी परत आली रावसाहेबाच्या खोलीत तिला बागड्याचा आवाज ऐकू आला आणि मग तिला जे दिसल ते तस दिसण्यापूर्वीच दृष्टि नाहीशी झाली असती तर बर झाल असत अस तिला वाटल !

रावसाहेबाच्या बेछुट भोगवृत्तीन राध्याच्या बायकोच्या शीलाला डंख मारले होते ! एकाद्या धटिंगणान केलेली आणि पुन्हा बेपर्वाईनं फेकून दिलेली लूट सावडावी तशी राध्याची बायको वस्त्रासह स्वत ला सावरीत होती. वहिनीला दारात पाहताच मोठ्यान हबरडा फोडावा अस तिला वाटलं.

पण कमालीच्या लज्जेन ती पदराआड तोड करून मुटकुळा होऊन बसली आणि गुडघ्यात तोड घालून रडू लागली

" वहिनी ! माझी चूक नाही ग ! " अस म्हणून तिन सगळा प्रकार सांगितला रावसाहेब दुसऱ्या दारान निघून गेले. मर्मावर घाव बसावा तशी वहिनीची स्थिति झाली 'आई ग' असा एक बारीक चीत्कार काढून तिन भिंतीचा आधार घेतला. प्रतिष्ठिताची अब्रू साभाळणाऱ्या अर्थपूर्ण मुके-पणान राध्याची बायको तेथून निघाली वहिनी तिच काय सात्वन करू शकणार ? पतीच्या अधम कृत्याला तिला साक्षी ठेवण्यांत नियतीचा काही हेतु होता काय ? रावसाहेबाच्या वासनेला स्नेहसबधासारखे जिव्हाळयाचे सबधहि दिसत नव्हते ? पैसा आणि स्वास्थ्य माणसाला उच्छृखल करतात? अविवेक, अविचार, अनाचार आणि अत्याचार हीच श्रीमतीची लक्षण आणि प्रतिष्ठेची परपरा मानावी काय ?

त्या दिवशी वहिनीच्या नजरेला नजर देण रावसाहेबाना शक्य नव्हत. त्या दिवसापासून वहिनीन आपली शय्या उचलली आणि ओसरीवर आणून टाकली. रावसाहेबाना त्याची पर्वा नव्हती. थोडस तोड खाली केल, पापकृत्याची कबुली दिली, आणि पुन्हा अस घडणार नाही अशी गळयावर हात ठेवून शपथ घेतली की, नुसत्या साडपाण्यावर फुललेल्या आणि फळ-लेल्या अगणातल्या झाडावरची फुल–फळ तोडायला किती उशीर, अस राव-साहेबाना वहिनीसबधी वाटत असेल कारण आता तर रावसाहेबानी उघड उघड एक मुसलमानीण ठेवली आणि मुक्त विलासासाठी वाड्या-बाहेरच एक रगमहाल निवडला !

त्या रात्री नानासाहेबाची प्रकृति फार बिघडली. ते हातपाय झाडू लागले. रावसाहेबाच या वेळी जवळ असण आवश्यक होत. वहिनीन कदील घेतला आणि रावसाहेबांच्या रगमहालात प्रवेश केला. नौकर तिला अडवील हे शक्य नव्हतं. जिना चढून ती वर आली आणि तिन

खिडकीतून पाहिलं रावसाहेब पानाचा विडा चघळीत पलगाच्या बाजूला एका खुर्चीवर बसले होते समोर पलगावर हात पाठीमागं टेकून आणि पसरलेल्या पायाची अढी घालून त्याची रक्षा एका खाद्यावर मान कलंडती करून त्याच्याकड पाहात होती तिच्या अगावर एक अत्यत झिरझिर अस वस्त्र होत ते एका स्कधावरून सुटून उरोजावरून खाली सरकल होत !

तिच्या सडपातळ अगाला साजेल अशाच तिच्या उरोजाकड रावसाहेबानी दृष्टिक्षेप केला असावा. अनगाच्या दाहकतेच्या अग्निशिखा रतीच्या उरोजावर प्रथम आदळल्यामुळच की काय त्याची अग्र काळीनिळी पडली, असाहि विचार त्याच्या मनात आला असावा !

प्रियकराची वाट पाहात अर्धवट लाभलेल्या निद्रेतून ती नुकतीच जागी झाली होती, की प्रणयभारान जड झालेल्या पापण्यात प्रियकराला गुतवून मोहाच्या आणि गुगीच्या प्रातात घेऊन जाण्यासाठी आतुर होऊन बसली होती, कुणाला माहीत ?

दार ठोठावून घोगऱ्या आवाजात वहिनीन म्हटल,

" घरी चला ! "

रावसाहेब प्रथम चरकले आणि मग चडफडले ते बाहेर आले आणि घराकड चालू लागले. चालताना त्यानी विचारलं,

" काय काम आहे ?"

" नानासाहेबाची तब्यत फार बिघडली आहे ! "

" तुम्ही का आला ? घरातली गडी माणस मेलीत काय ?"

" आपल्या कृपेन जिवत आहेत अद्याप तो ! पण इथ बोलावू आली असती तर कदाचित् मेली असती ! "

वाड्याच्या पायऱ्या आल्या. रावसाहेब झरझर वर चढले. एकाद्याला वाटल असत अत्यवस्थ वडिलाना भेटायला ते अधीर झाले आहेत. पण तस कांही नसाव. शक्य तों लवकर परत कस येतां येईल हाच विचार त्याच्या मनांत असावा.

त्याना उजेड दाखवीत त्यांच्या पाठीमागून जाणाऱ्या वहिनीची बाजूला नजर गेली अधारात एकाद्या ‘जल्लद’ शस्त्रासारख तिला काही तरी तळपलेल न् चमकलेल दिसल. तिन नीट पाहिल वाड्याच्या बाजूला असलेल्या झाडाच्या बुध्याशी तुरुगातून सुटून आलेला राध्या पाजळलेली कुऱ्हाड घेऊन उभा असलेला तिला दिसला त्या दिवशी दुपारी रावसाहेबाच्या खोलीत पदराआड तोड लपवून बसलेल्या राध्याच्या बायकोचा अतर्दाह आणि राध्याची सूडवृत्ति त्या कुऱ्हाडीच्या धारेवर चमचमत तर नव्हती ? वहिनीला पाहताच एकहि शब्द न बोलता राध्या तेथून सरकला !

वहिनी वाड्यात शिरली ती कमालीच्या भयाकुल मन स्थितीत. ती परत यावयाच्या आत नानासाहेबानी आपला अवतार सपविला होता आणि त्या प्रसगान तिची भयाकुलता आणि औदासीन्य अधिकच वाढल होत !

त्या [illegible]न वहिनीला हसतमुख अस कुणी पाहिल नाही. तिला रात्री नीट झोप येत नव्हती लागलाच थोडासा डोळा तर एकदम शस्त्रासारख काही तरी चमकल्यासारख तिला दिसत होत. ते शस्त्र थेट तिच्या काळजापर्यंत जात होत. मग कुणी तरी तिच्या सौभाग्यचिन्हाकड रागान पाहात होत. आणि ती एकदम किंचाळून उठत होती ! ओसरीच्या खाली तिची सोबत करण्यासाठी निजलेला म्हातारा महादू म्हणत होता,

“वैनी ! ए वैनी ! जागी व्हय ! भ्येव वाटल व्हय ! ....”

सकाळी वहिनीचा म्लान चेहरा पाहून मजुळा महारीण विचारीत होती,

“ बर नाही वाटत जिवाला वैनी ?”

“होय ग ! रात्री स्वप्नच पडतात वाईट !”

“ दिवस लई वगाळ आलेत वैनी !”

दिवस कुणाला वाईट आले होते कुणाला माहित ?

वहिनी न् रावसाहेब एका लग्नाहून परतत होते. लग्न एका निकटच्या नातेवाईकाच्या घरी होतं. शिवाय लग्नात मुद्दाम आणविलेल्या ठिकठिका-

णच्या नामांकित नर्तिकांचं आणि गायिकांचं फार मोठं आकर्षण होतं. त्यातल्या एकीला आडगावी येण्याचं रावसाहेबानी निमंत्रण दिलं आणि लगीन आटोपताच रावसाहेब त्या गायिकेचं शेवटचं पान खाऊन निघाले.

वहिनी न् रावसाहेबाना जोडीनं चालताना कित्येक नजरा त्यांच्या अनुरूपतेवर लुब्ध झाल्या असतील ! पण छकड्यात बसल्यावर दक्षिणोत्तर चेहरे करूनच ते बसले होते अस्तमान झाल्यावर छकड्यापुढं चालणारा धन्या महार थोडासा पुढं सरकला आहे असं पाहताच आडरानात त्यांचा छकडा एकदम अडविला गेला, छकडा हाकणाऱ्या गड्यानं रावसाहेबाना हाक मारली.

रावसाहेब चौधऱ्यांचा छकडा अडवून उपमर्द करणारी ती कोण व्यक्ति आहे हे पाहण्यासाठी रावसाहेबांनी पडदा सारला अंधारात नीट दिसलं नसावं. रावसाहेबानी खडसावून विचारलं,

" कोण ? कोण आहे ते ? "

" मी राध्या आहे धनीसाहेब ! "

राध्यानं अशा आवाजात जबाब दिला कीं त्यात त्याची लीनता दिसण्यापेक्षा चढेलपणाच प्रकट व्हावा ! त्याच्या हातात परजलेली कुऱ्हाड दिसत होती. तुरुंगातली हवा तरी एकाद्याला काय मानवते पहा ! राध्या सुटून आल्यापासून असा काही आडवा तिडवा वाढला होता की तट्या भिल्लाचा एकादा सगासोयराच आपण पाहतो आहो असं वाटत होतं !

त्याला पाहून रावसाहेबाचं अवसान थोडंसं लटपटलं. पेंगलेली वहिनी एकदम जागी झाली. तिला हा प्रकार कळताच ती एकदम खालीं उतरली आणि तिनं राध्याला हाक मारली,

" राध्या ! "

राध्या चमकला ! त्यानं म्हटलं,

" तू बी हायस का वैनी ? धनीसाहेब एकटंच असतं तर बरं झालं असतं ! बरं जा ! रामराम धनीसाहेब ! वैनीला आतां इथं धरून ठेवलं

तर तिला सोडवून न्यायची हाय का हिमत? मला माझ्या आयाबहिनीची अजून वळख आहे! बरं चला! भेटू पुन्हा”!

राध्या कुन्हाड खाद्यावर घेऊन अधारात दिसेनासा झाला.

वहिनी झोपेत जे पाहात होती ते आताच्या प्रसगाशी निगडित असाव! पण आधी स्वप्न पडत होती आणि नतर प्रसग घडत होते.

असावध असताना रस्त्यात झालेला अपमान रावसाहेबाना मानवण्यासारखा नव्हता! प्रसगाची ते वाट पहात होते. त्यानी राध्याला गाठलं. पाचसहा जणाकरवी त्याला बाधून टाकल आणि रागाच्या आणि मस्तीच्या भरात त्यानी स्वत त्याच्या अगावर काठ्यामागून काठ्या घातल्या.

राध्याच अग सडकून निघाल होत आणि डोक फुटल होत!

कोर्टकचेऱ्या कशा कराव्या याची गावकऱ्यानाहि आतां चागली माहिती झाली होती दबून बसलेले द्वेष या प्रसगान भडकले राध्याला दवाखान्यात घातल जखमेवर टाके बसले. आणि मग गावकऱ्यानी राध्याची बाजू घेऊन मुकदमा लढवायला आरभ केला रावसाहेब तुरुगात अडकले जावे आणि त्याची जहागीर गारद करावी अशीच गावकऱ्याची इच्छा होती

ज्याची शेत चौधऱ्याच्या घशात गेली होती, आणि जातील अशी ज्याना धास्ती वाटत होती त्या सर्वाच पाठबळ राध्याला होत!

फौजदार आणि फौजदारीचा अनुकूल निकाल लावणाऱ्या लहानसहान दुव्यांना अशा प्रसगान सोन्याच पाणी चढत असत. ते ज्या पक्षाकडून जास्त चढेल तोच यशस्वी, असा सरकारी न्यायालयातला खाजगी निकाल असतो.

अखेर रावसाहेबाचच बळ अधिक ठरल. निकाल लागला तो रावसाहेबांना अनुकूल असा!

राध्याला मारहाण झाली ती खरी होती! पण ती रावसाहेबान केली नव्हती. तस करण्याच काहीच कारण नव्हत. राध्या चौधऱ्याचा जुना नौकर. त्यामुळ सरकारी वकिलान केलेले सगळे आरोप खोटे होते.

मारामारी झाली होती ती चौधऱ्याचा रामोशी धन्या आणि राध्या यांच्यात. मारामारीचं कारण दोघातली खाजगी 'खुसुमत'.

रावसाहेब निकाल लागल्यावर उजळ माथ्यान वरवाड्यात परत आले. पण मंजुळेचा नवरा धन्या मात्र त्यानी स्वत च्या सुटकेसाठी तुरुगात अडकविला ! जणु आडगावातल्या मालमत्तेबरोबर वाटेल त्याच जीवनहि विध्वंसून टाकण्याचा त्याना अधिकार होता !

वहिनीला झोपेत आणखी एका कृत्येची आकृति दिसू लागली. ती केस पिजारून आणि नख रोखून गळा दाबण्यासाठी जवळ येते आहे असं भासू लागल ती कृत्या खेकसून म्हणू लागली,

" ××× ! कुठय् माझा नवरा ? त्याला तुरुगात घातलस नाही का? "

ती मजुळा तर नव्हती ?

वहिनी झोपेतून दचकून आणि ओरडून उठू लागली. फारशी झोप नसलेला महादू म्हणू लागला,

" वैनी ! ए वैनी ! जागी व्हय ! .... "

मग झोप आणि जागेपण यातला फरक वैनीला ओळखू येईनासा झाला एका रात्री अशीच ती जागी झाली, ती स्वप्नात दिसणाऱ्या भीषण आकृतीच्या ओरडण्यान की, महादूच्या हाकेन, कुणाला माहीत ?

ती खरच जागी झाली तेव्हा स्वप्नहि खर होत होत, आणि महादूची हाकहि पुन पुन्हा कानावर पडत होती ! वाड्याबाहेर फार मोठ्या जमावाची ओरड चालली होती रावसाहेबानी दार आतून बद केल होत आणि वरच्या माडीवरून ते बदूक उडवीत होते. भयान गागरून गेलेली वहिनी माडीवर धावली. तितक्यात वाड्याच मागच दार उघडून जमावाला आंत घेतलेला राध्याहि वहिनीच्या पाठोपाठ लपत छपत माडीवर गेला. राध्याच्या हातांतली ती कुऱ्हाड आणि त्याचा तो अवतार पाहून वहिनीन भयानं रावसाहेबाना मिठी मारली. कुऱ्हाडीचा घाव पडला तर रावसाहेबाच्याऐवजी तो आपल्या अगावर पडावा, आणि मग जीव घेणारी त्या शस्त्राची धार अजिबात नष्ट व्हावी असा तिचा हेतु होता, हें उघड होत. राध्यानं तें पाहिल. तो म्हणाला,

" वैनी ! हट् बाजूला ! "

रावसाहेबानी तेवढ्या त्या क्षणाचा फायदा घेऊन बदुकीच्या गोळीन राघ्याची छाती फाडली. जमिनीवर कोसळलेला राघ्या म्हणाला,

" वैनी ! वैनी ! घात् केलास माझा ! .... "

राघ्याचे जोडीदार एव्हाना वर चढले होते. रावसाहेबाच्या गोळयाहि संपत आल्या होत्या वहिनीला वेगळ करून त्याना उघड्या अंगणात खेचण्यात आल

रावसाहेबाच्या मस्तकात बसलेला कुणाच्या तरी कुऱ्हाडीचा 'खच्च' असा आवाज कानी येताच वहिनीनं खालच्या अंगणात उडी घेतली.

बरवाड्यातील भाग्यश्रीचा तो अस्त होता !



रात्री शिळ्या वरणाला फोडणी देऊन ताज्या भाकरीच्या पातळ कुडकुड वाजणाऱ्या तुकड्यासह मिटक्या मारीत जेवणारा, आणि तें तस खाल्ल्यावर पचपक्वान्नाच जेवण झाल्यासारखा चेहरा करून गभीर ढेकर देणारा, ढेकणाचं मोहळ झालेली पटकुर वर खाली घेऊन रगमहालांतली रंगदार झोप मिळाली अस भासविणारा, सकाळी टिचिटिची पोटांच्या मुलाचं लगर घेऊन दवाखान्यात जाणारा, किवा हाडकोळी, डोळ्याखाली काळी वर्तुल पडलेली, गालफडं वर आलेली आणि ससाराच्या धसक्यान छातीच तळघर झालेली बायको स्वयपाकाला उपयोगी पडावी म्हणून डॉक्टरच घर शोधणारा, मळकट शेरवानीला राजधानीतल्या मीनाराची आकृति असलेल्या काळ्या पडलेल्या बटन्स लावणारा ! कचेरीप्रमाणच लग्नप्रसगी अथवा इतर समारंभाच्या वेळी डोक्यावर घामट जिरेटोप (दस्तार) घालणारा पचवीस वर्षांतली नौकरीतली लाचारी शंभर वर्षं अगी धरण्याची हिंमत असलेला, 'महाराजा' या सबोधनान परिचिताला नमस्कार करणारा अथवा त्याचा नमस्कार स्वीकारणारा, दात नसताना हसणारा, किवा ते असून हंसण्याच त्राण नसताना हस्तीदती करणारा, 'काय राजाजी बाजारात निघाला वाटत ? ठीक ! तादूळ महागला नाही ? ' असे महान् गहन आणि अपूर्व विषय छेडणारा, पगार, बढती, अधिकारी, त्याचा राग, घरची परिस्थिति, बाळतपण, मुलीची लग्ने, मुलाच्या मुजी या कार्यातील अडचणीचे डोगर रचणारा आणि त्याखाली खचणारा, उसनवारी करणारा आणि ती फेडणारा, म्हटला तर सधन, म्हटला तर गरीब, दिसायला सभावित पण लुच्चेगिरीचे सगळे रगढग केलेला, प्रसगी कर्मठ तितकाच भक्तिमान्, कथाकीर्तनप्रसगी परमार्थाकडे वळणारा आणि घरी आल्यावर कपड्याबरोबर वेदान्तहि खुटीवर टागून ठेवणारा, जीवन नीरस आहे अस बोलून दाखविणारा, पण त्यातील रसवत्तेला चावून चोखून टाकणारा किवा तशी मनीषा बाळगणारा आणि त्यासाठी धडपडणारा फार मोठा वर्ग राजधानीच्या 'गुलजार बाग' नावाच्या भागात प्रामुख्यान रहात असे !

याच भागातल्या एका वळणावरल्या घरातल्या प्रवेशद्वारानजीकच्या लहानशा खोलीत एक आसामी राहात होती तिच्या नावगावाचा व्यव-

सायव्यवधानाचा आणि विचारविवचनाचा कित्येक दिवस शेजाऱ्यांना पत्ता नव्हता

त्या घरातली पाढरी माणस दहा वाजता जामानिमा करून कचेरीला निघत तसाच त्या खोलीचा मालकहि पिठलभाताचे दीर्घ ढेकर देऊन आणि कचेरीला जाण्याची ठराविक ' महावस्त्र ' अगावर चढवून हातात कागदाच पुडक घेऊन बाहेर पडत असे. त्या कागदाच्या सरक्षणासाठी त्यान जस्ताच एक लहानस नळकाड तयार करवून घेतल होत जणु विक्तोरिया (Victoria) राणीच्या सहीचेच ते कागद होते, अस भासवायचा त्याचा विचार असल्यास न कळे ! दिल्लीच्या व्हाइस्रॉयला सामोरा निघाल्याप्रमाण तो नेहमी झपझप चालत असे. त्याची ती ठेगणी आकृति आणि ती तुरुतुरु चाल पाहणाराला मोठी गमतीची वाटे ! ' गिड्डू ' असं गमतीच नाव नेहमीच्या बघ्यानी त्याला दिल होत !

त्याची दिवसभर फिरायची ठिकाण आता जवळ जवळ ठरून गेली होती !

सकाळी गुलजार बाग सोडताच तास दीडतासान जहागीरदार-नवाबांच्या वस्तीचा 'शाहद बडा' नावाचा भाग पायाखाली घालून मग 'मुख्य प्रधान' राहात ती 'बदे अली'ची देवडी तो गाठीत असे मग महकमे मालगुजारीच्या महाद्वारावरून निघून 'धनवती'च्या राणीसाहेबाचा राजवाडा ज्या भागात होता तेथून एक चक्कर करून यावयाला तो विसरत नसे. सध्याकाळी घरी आल्यावर 'थडा फराळ' या नावान सुलभ आणि सुप्रसिद्ध असलेला अपूर्व सात्त्विक उपाहाराचा कार्यक्रम आटोपून मग काही ओल्यासुक्या आणि असल्यास शिळ्यापाक्याचा सत्कार करीत रात्रीचे काजवे आणि चादण्या मोजीत तो आथरुणावर पडत असे.

त्या भागातल्या बऱ्याच 'मडग्या' आणि घर धनवतीच्या राणीच्या मालकीची होती खोलीच भाड वसूल करायला आलेला राणीचा एक मुनीम भाड्यासाठी या खोलीमालकाशी तक्रार करूं लागला. सभाषणाच्या ओघात मुनीम म्हणाला,

" तुम्ही कोण कुठले जहागीरदार लागून गेला आहा ?"

इंग्लडचा राजा भिकारी होऊन गल्लोगल्ली हिंडू लागला आणि त्याच्या नांवगांवाची चौकशी होऊ लागली तर तो ज्या गाढ उदासीनतेन हसेल त्या पद्धतीन या खोलीचा मालक हंसला ! जणु खरच तो कुठला जहागीरदार होता !

शेजाऱ्याना वाटलं ही गिड्डू मूर्ति रात्री हळूच खोली रिकामी करून पोबारा करणार ! पण तस काही झाल नाही. त्या व्यक्तीची शेजाऱ्यांना ओळख पटली ती एका नॉटपेड पत्रावरून !

एक नॉटपेड पत्र घेऊन पोस्टमन्‌न त्या वाड्यात दोनतीन चकरा केल्या. 'राजासाब' 'राजासाब' अशा ललकाऱ्या घातल्या.

एका शेजाऱ्यान ते नॉटपेड पत्र घेऊन त्यावरला पत्ता वाचला,

" राजा अंबिकाचरण दासरावजी रावसाहेब आडगावकर चौधरी जहागिरदार "

शेजारी थोडासा थक्क झाला. खोलीच्या मालकाचा आता वेगळा परिचय करून द्यावयाची अथवा घ्यावयाची काही आवश्यकता नव्हती. त्यान आपणहून त्या नॉटपेड पत्राचे पैसे चुकवून ते पत्र घेतल आणि जहागिरदारसाहेबांच्या स्वाधीन केल.

पत्राचे भरलेले पैसे मात्र शेजाऱ्याला परत मिळाले नाहीत !

आज चौधऱ्याच्या नावावर एकदम दोन नॉटपेड पत्र आली !

पत्त्यांवरील त्या नावगावाच्या मोठेपणाचा पोस्टमनवरहि परिणाम झाला होता की काय न कळे ! किंवा पत्राच्या मालकाकडून एकादं मोठ इनाम लवकरच मिळेल असहि त्याला वाटत असावं !

दर पंधरावीस दिवसानी त्या पत्त्यावर एकादं तरी नॉटपेड पत्र नियमान यावयाच हे अगदी ठरून गेल होत.

पोस्टमन त्या भाडघराच्या महाद्वाराशी उभं राहून अदबीन हाक घालीत असे,

" राजासाऽब ! "

ती पोस्टमनची हांक आहे हे चौधरी ओळखीत असत. कारण तो आता त्याच्या परिचयाचा आवाज झाला होता—शिवाय सूर्याचो किरणं खोलीत आथरलेल्या एका मळक्या सतरजीवर पडून ज्या ठिकाणी तिला मोठ मोठी छिद्रं पडली होती तिथ आली की एक विशिष्ट वेळ झाली असं कळून येत होत पोस्टमनची हाक नेमकी त्याच वेळी येत होती. खोलीत जें घड्याळ होत त्याची टिकटिक चालू असली तरी काट्याच्या हाल-चालीत काही बिघाड झाला होता. आठ वाजायच्या वेळी दहावर काटा येत असे. नाही तर दोन्ही काटे एकाच ठिकाणी अडून बसत होते. त्यामुळ वेळेच्या बाबतीत नेहमी फसगत होत होती. एकाद्या शेजाऱ्यानं अथवा शाळकरी पोरान 'किती वाजले' अस विचारल तर चौधरी प्रथम सूर्यकिरणाकड पाहून मग घड्याळाकड क्षणभर नजर लावीत आणि अत-र्ज्ञानानं एकादी गोष्ट फाडकन् बालून टाकावी तस किती वाजले, तें सागत !

दारातून हाक घालणारा पोस्टमन आहे हे कळलेल असूनहि, चौधरी आपल्या ठराविक पद्धतीनं विचारीत,

" कौऽऽव्ऽन् ? "

आणि अपेक्षित उत्तरासाठी आपली श्रुतिशक्ति ताणीत.

" जी, मै खादीम ! "

(महाराज मी आपला सेवक.)

ते ऐकल्यावर चौधऱ्यांच ऊर अभिमानानं थोडंस फुगत होत. पण असं उत्तर आल की चौधऱ्याच्या नावाच नॉटपेड पत्र आहे, हे नक्कीच वाटत होत. पोस्टमन पुढ येऊन नॉटपेड पत्र चौधऱ्याच्या हाती देई. चौधरी पत्त्यावरून नजर फिरवीत, ' श्रीमत राजा अंबिकाचरण दासरावजी रावसाहेब आडगावकर चौधरी जहागीरदार ' अशी सगळीं बिरुद असलीं म्हणजे त्याना समाधान वाटे. मग तत्काळ पत्र फोडून तारेतला मजकूर जेवढ्या घाईनं वाचतात तसं तें लाबलचक पत्र वाचू लागत.

पोस्टमनन खाकरून थाबल्याचा इषारा केला की चौधरी भानावर आल्यासारखे करून म्हणत,

“अरे हो! पैसे द्यावयाचे नाही का ?” मग पर्शियन कोटाचे सगळे खिसे पाहून होताच ते म्हणत,

“मोड नाही!”

पर्शियन कोटाच्या खिशात शभर रुपयाच्या नोटाच आहेत असा त्याच्या चेहऱ्यावरचा भाव असे.

पोस्टमन् जाताना अदबीन सलाम करी. तो स्वीकारताना चौधरी खाली मान वाकवून कपाळापर्यंत हात नेत.

वदन स्वीकारण्याच्या या विनम्र पद्धतीतून चौधरी आपल सौजन्य प्रकट करीत की नॉटपेड् पत्राचे पैसे देखील जवळ नाहीत याची लज्जा अथवा निर्लज्जपणा झाकण्यासाठी तोड वाकवीत, कुणाला माहीत!

आजहि या सर्व प्रकाराची पुनरावृत्ति झाली! त्याना वाटलं असाव तिकिट लावलेली कार्डपाकिट पाठवायची पत्रव्यवहाराची पद्धति सुशील, सभावित आणि सुसस्कृत तर खरीच! पोस्ट खात्याच ऋण आधी चुकत केल्यामुळ त्याचा बटवडा बिनबोभाट होतो निदान पोस्टखात तस मानत. पण या सुसस्कृत पद्धतीमुळ होणारा रानवटपणा केवढा घृणास्पद! सगळी अंगोपाग झाकण्याच सोग करणाऱ्या पथनारीचा चहाटळपणा आणि पोस्ट खात्याचा महसूल चुकवून विकत घेतलेल्या कार्डावरील उघडा पत्र-व्यवहार यात फारसा फरक नाही म्हटल तर झाकलेला आणि म्हटल तर उघडा असा त्या कार्डावरला एकाद्याचा हृदयाविष्कार कोणत्याहि तिऱ्हाइताला पाहाता येतो. नग्नतेकड पाहण्याच टाळणारी एकादीच सभावित दृष्टि आढळली तर आढळते!

घाण तोडाच्या लाडक्या मुलासारखच आपलं कोडकौतुक पुरवून घेऊन निघालेली पाकिट वरवर श्लील वाटली तरी अतर्यामी अत्यत छचोर आणि कमालीची चावट! ती जेवढो अबोल तेवढीच बोलकी! आत काय असाव या कुतूहलान फाडाफाडीचा अत्याचार करविणारी आणि दुराचाराला अवसर देणारी!

मुलान सुनेला लिहिलेल पाकीट दाबणाऱ्या सासूला ते विचाराव! चोरून लिहिलेल्या पत्राची वाट पाहाणाराकडून ते माहीत करून घ्याव, किंवा घोसदार मजकुराच गुलाबी पाकीट छातीला लावून बसणाऱ्याकड पाहून ते ओळखून घ्याव!

नॉटपेड पत्राच तस नसत!

ती ज्याची त्याला पोचण्याची भलती निश्चिति असते गावाच्या नावावरून ते पाठविणाऱ्या व्यक्तीची आणि तिन लिहिलेल्या मजकुराचीहि सहज कल्पना येऊ शकते. अन् विशेष हे की पत्त्यावरच्या मालकाखेरीज ती इतराच्या हाती पडत नाहीत अन् महसुलाच्या भूर्दडाच्या भयान त्याला स्पर्श करण्याची कोणी इच्छाहि करीत नाही.

चौधऱ्याना मधून मधून जी नॉटपेड पत्र येत त्याची ठिकाण, ती पाठविणारी माणस आणि त्यातील मजकूर ठरून गेला होता

आज आलेल्या पत्रातल जाड पत्र नेहमीसारखच हिवरखेडहून आल होत. पण यावेळच त्याच वजन मात्र नेहमीपेक्षा अधिक होत. चौधऱ्याचे धाकटे बधु श्रीमत राजा पुरुषोत्तम रावजी रावसाहेब आडगावकर चौधरी जहागीरदार याच्या कडून आल होत हिरवखेड जिल्ह्याच्या अबकारी कचेरीत राजा पुरुषोत्तम रावजी कारकुनी करीत होते सरकारी रकमेंत काही कमी अधिक झाल्याच्या सशयावरून कित्येक दिवसापासून त्याचा पगार अडून होता. सौभाग्यवतीचे प्रसूतीचे दिवस आले होते. अशा अडचणीच्या वेळी चौधऱ्यानी कमीत कमी पन्नास रुपये तरी पाठवावे अशी शेवटी कळकळीची विनती केली होती!

चौधऱ्यांजवळ नॉटपेड पत्र घ्यावयाला मोड नव्हती तसे पन्नास रुपयेहि नव्हते. ते बंधूना पत्र लिहू लागले. त्यानी प्रारभीचा सगळा मायना झोकात लिहिला. गेल्या कित्येक वर्षांपासून आडगावची जहागीर सोडविण्याची ते खटपट करीत होते.चौधऱ्याची कुळदेवता त्या कार्यांत केव्हा यश देणार होती कोण जाणे! राजधानीच्या ठिकाणी आणि त्यातल्या त्यात जहागीर सोडविण्याच्या भानगडीत, प्रत्येक हालचाल

पैशाखेरीज होत नव्हती. त्यासाठी आजवर किती खर्च झाला होता हे सागण्यात मतलब नव्हता. पुरुषोत्तम रावजींची पैशाची मागणी गैर नव्हती पण श्रीमत अंबिकाचरण ' मजबूर ' होते एकदां जहागीर सुटली की पैशाची मुळीच अडचण पडणार नव्हती. तवर पुरुषोत्तम रावजींनी काही-तरी आणि कशी तरी व्यवस्था करावी अस नेहमीप्रमाणच विनवून लिहिल होत !

दुसरं पत्र ' राजा वडगाव 'च्या 'रामप्यारी' नावाच्या चौधऱ्याच्या रक्षेचं होत. चमत्कार असा की पैशाची अडचण म्हणून ते पत्र नॉटपेड पद्धतीत पाठविल नव्हत उलट आत पैसे हवे असल्यास घेऊन जा असाच सार्थ मजकूर होता. केवळ चौधऱ्याच्या प्रतिष्ठेला बाध न येता पत्रा तल्या मजकुराची गुप्तता राखली जाईल अशीच थोडीशी खेडवळ आणि अडाणी समजूत त्या पद्धतीच्या मुळाशी होती

चौधऱ्यानी पुन. पुन्हा ते पत्र वाचल आठवणीनी त्याच मन भारावल गेल की पोस्ट खात्याच्या नजरेला आपल रहस्य येऊ नये या कल्पनेन त्याचा हात जड पडला, कुणाला माहीत !

त्या नॉटपेड पत्राला त्याना उत्तर लिहिता आल नाही ! आयुष्या-तल तेवढ ते एकच नाजुक रहस्य शब्दातहि सागण्याची त्याची इच्छा नव्हती की काय कोण जाणे !

घराण्याची प्रतिष्ठा, परपरा या गोष्टी चौधऱ्याच्या मनात फार तीव्र होत्या. प्रवासात अथवा अन्यत्र स्वतःच नाव सागण्याची वेळ आली म्हणजे चौधरी म्हणत,

" या देहाला अंबिकाचरण म्हणतात ! "

भाषा, सपद्राय. रूढी, अशा गोष्टी आत्मपरिचय करून देण्यासाठीं केवढी बधन घालतात, याचा अशा वेळी त्याना विचित्र अनुभव येत असे.

आणि मग ते अशी चर्या करीत की जणू त्या देहाच्या प्रतिष्ठेला फार अपूर्व परपरा होती !

चौधऱ्याच्या परिचिताना त्याची पूर्वपीठिका कळली असावी असं दिसत होत ! कारण एखाद्या नवख्या माणसाशीं चौधऱ्याचा परिचय करून द्यावयाचे शब्द ठरून गेले होते,

"आपणच ते राजा अंबिकाचरण दासरावजी रावसाहेब आडगांवकर चौधरी जहागीरदार !"

अशा वेळी चौधऱ्याच्या मानेत ताठा येऊन खोट्या शालीनतेच्या सगळ्या बारकाया ते परिचयोत्तर कराव्या लागणाऱ्या प्रतिवदनातून प्रगट करीत असत. परिचय करून घेणाराला त्याच्या बिरुदाचा फारसा बोध झाला नसला तरी ते एक बडं प्रस्थ असावं असं त्याला वाटे.

नव्या पिढीला "किल्ले घेडगाव"चे 'पाठ फोडे' उमरखेडचे सरदेशपांडे किंवा आडगावचे चौधरी, या नावाचं मोठेपण माहित असायचं काहीच कारण नव्हतं. आठवा एडवर्ड किंवा पंचम जॉर्ज या तोडीची तीं माणसं नसावी ! आणि असली तरी इनामागजमा झाल्यामुळं चालू काळात झळकण्या सारखं त्याच्या वंशजात कोणतं वैशिष्ट्यच उरलं होतं ?

गुलजारबाग भागात आधुनिकतेचा लत्ताप्रहार झाल्याची खूण म्हणून वाळकुज्या पोरांचं आरोग्य वाढविण्यासाठी एक 'व्यायामशाळा' स्थापन झाली होती.

तिचा एक वार्षिकोत्सव आला. उत्सवदिन ठरला. पत्रकं वाटलीं गेली. श्रीमंत राजा अंबिकाचरण दासरावजी रावसाहेब आडगावकर चौधरी जहागीरदार, उत्सवाचं अध्यक्षस्थान भूषवितील असं जाहीर करण्यात आलं.

सभेच्या वेळी व्यासपीठावर मांडलेल्या टेबलाच्या एका कोपऱ्यावर एक हात टेकवून आणि कमरेला वाक देऊन संस्थेचे 'व्यायामविशारद' हाडकोळे चिटणीस चाचरत त्या प्रसंगाच्या योजनेचं कारण सांगू लागले. मग शेवटी त्यांनी म्हटलं,

"आजच्या समारंभाचं अध्यक्षस्थान आडगांवकर चौधऱ्यांनी भूषवावं अशी मी त्याना विनंती करतो !"

चौधऱ्यानी गळ्याभोवतीच जरतारी उपरण सावरून सिहासनाकडं जाणाऱ्या राजपुत्राच्या थाटात पदक्रम करीत खुर्ची गाठली आणि कानावर टाळ्याचा कडकडाट घेऊनच मग ती भूषविली चौधऱ्याच्या विद्वत्तेचा तळ लावण्याचा प्रयत्न कुणी केला नव्हता. त्या काळच इग्रजी 'बगाली रीडर' मालिकेतल शेवटल पुष्प त्यानी सपविल होत. मग वकीलीच्या परीक्षे-साठी राजधानीकड धाव घेतली होती परीक्षेच्या कारभारात त्या काळी अनेक गोधळ होते, त्याच नाव निकालात निघाल नाही. आणि तस म्हटल तर जात्याच त्याच्या कविमनाला "फौजदारी" "धर्मशास्त्र" अशा कायद्याच्या किचकट भानगडीचा अभ्यास जमण आणि जुळण शक्य नव्हत

प्रवासान आलेल चातुर्य आणि सभाधीटपणा अगी असल्यावर प्रास-गिक बोलायला फारस भाडवल लागत नाही.

आपला पडता काळ, पूर्वजाविषयीची अनास्था, अधर्माचरण, आणि यामुळ होत असलेली अवनति, असे एकेक तोफेचे गोळे सभेत आदळले, आवाज क्रमाक्रमानं चढविला, कधी उत्तरेला तर कधी दक्षिणेला हातवारे केले, 'मी तुम्हाला सागून ठेवतो' 'मला अस सागायच आहे की' 'माझ तुम्हाला हे सागण आहे की' अशी एकेक 'पाणीदार' (पाणी प्यावयाची वेळ आणणारी किवा आता वक्त्यात फारस पाणी उरल नाही अस सूचित कर-णारी) वाक्य उच्चारली की एक जोरदार व्याख्यान झाल, अस म्हणायला काहीच हरकत नाही !

दासराव चौधऱ्यानी व्यायाम शाळेच्या उत्सवानिमित्तान अध्यक्षपदा-वरून असच भाषण केल आणि अखेरीस व्यायामशाळेला एकशेएक रुप-याची देणगी जाहीर केली.

उत्सव करणाराचा हेतु साध्य झाला होता. उत्सवप्रसगी मिरवून घेणाराची तृप्ति झाली होती. आणि उत्सवात अध्यक्षीय भाषण करणारान मोठेपण जाहीर करण्याची विचित्र हाव पुरवून घेतली होती !

मग उत्तरक्रियेला आरभ झाला होता !

व्यायाम शाळेचे चिटणीस कित्येक दिवस आडगावकर चौधऱ्याना शोधीत होते. चौधऱ्याना काम फार होती आज 'महकमे मालगुजारी'

उद्या 'बदे अली' ची देवडी, परवा धनवतीच्या राणीचा बगला, तेरवां 'चद्रगीर' चा मठ काय एक की दोन! त्यामुळ भेटीचा योग येत नव्हता!

चिटणीसान अखेर चौधऱ्याना गाठल. चौधऱ्यानी त्याची खात्री पटविली,

'एकदा जाहीर केलेली देणगी बुडविणारा मी अध्यक्ष नाही! गेल्या कित्येक वर्षांपासून आमची आडगावची जहागीर सोडवून घ्याव-याची मी खटपट करतो आहे चाळीस पचेचाळीस हजार रुपये अडकून पडले आहेत ते हाती आले की त्यातले शभर रुपये व्यायामशाळेच्या कारणी लावायला आणि द्यायला काही अडचण येणार नाही! तुम्ही माझ्या-वर विश्वास ठेवा! ''

अस म्हणून चौधऱ्यानी चिटणीसाला विश्वासात घेतल, आणि शेवटी त्याच्याकडूनच दहा रुपये उसने घेऊन आपली तात्पुरती नड भागविली

गुलजारबाग भागात राहणारा समाज निव्वळ आळणी नव्हता त्याला गाणं बजावण आवडत होत. दर गुरुवारी रात्री एकाद्या रिकाम्या माडीत काही गायनभक्त आणि रसिक मडळी जमत होती. 'गुरुवार क्लब' हें त्या मडळीन त्या मडळाला नाव दिल होत. पेटीतबल्याची जमवाजमव होत होती. मग बाहृयाच्या डोक्यावर पितळी हातोड्याचे घाव बसू लाग-ताच पेटीच्या स्वरात स्वर मिळविण्याची त्याची तयारी होत होती तशात चौधरी येत होते. " याव जहागिरदारसाहेब " अस त्याच स्वागत होऊन त्याना जागा करून दिली जात होती. ते ऐकून आणि पाहून चौधऱ्याना अतर्यामी फार धन्य वाटत होत. अन् त्यासाठीच ते क्लबात जात होते. पचपदीच 'नोम् तोम्' आटोपल्यावर खऱ्या गाण्याला आरभ होत होता. चौधऱ्यांनाही सगीताचा सपर्क होता. त्याची गाण्याची पाळी आली की कानाजवळ तळहात नेऊन 'काळी दुसरी'शीं स्वर जुळवीत होते आणि तो मनासारखा जुळल्यावर गायला आरभ करीत होते,

" लगर घी ऽऽट...."

काही आकार, ईकार आणि उकारान सुरू होणाऱ्या ताना सपल्या की माडीवर घाईच्या थापा मारून तबलजीला लय वाढवायला ते सुचवीत होते. मग एक दीडला भैरवी आटोपल्यावर पानसुपारीच तबक आलं की सगीताबद्दल गप्पा निघत होत्या. त्या गप्पात चौधऱ्याचाच मोठा भाग होता. ' बाई साव्ळापूरकर ' ' जोरावरखान ' 'नासरेबुवा' आणि ' सुदर्शन सिंग ' ही दरबारी गायक मडळी आडगावकर चौधऱ्याकड नेहमी यावयाची. थोरल्या दादासाहेब चौधऱ्याना सगीताचा फार षोक आणि दर्द! तो काळ गेला. चौधऱ्याची महान परपरा नष्ट झाली दर्दीच नष्ट झाल्यावर सगीत लुप्त व्हाव यात नवल नव्हत !

बैठकीतल वातावरण गभीर झाल्याच दिसताच चौधरी विनोदाकड वळत होते,

" उबरग्याच्या नवाबाकड बाई सावळापूरकराच गाण होत मीहि तिथ होतो. सकाळी साडेपाचला भैरवीला सुरवात झाली ती चीज सपल्यावर खूष झालेले नवाबसाहेब बाईकड वळून म्हणाले,

" बहोत खूब ! एक भैरवी होऊ द्या बाई आता ! " समेतल्या माणसाना हसता येत नव्हत. बाईच्या डोळ्यात पाणी आल होत. आणि तबला लावायचा हातोडा कुठ मारावा हे तबलजीला समजल नव्हत! ..

मुक्त हास्यान ती बैठक क्षणभर भरून गेली होती ! हास्याची लाट ओसरल्यावर गुरुवार मडळाच्या सचालकान गोष्ट काढली,

" आता पुढचा गुरुवार जहागीरदारसाहेबाकड ! " चौधऱ्यानी तत्परतेन उत्तर दिल,

" वा ! वा ! जरूर ! पण मला अस वाटत की आमच्या जहागिरीची कारवाई मुख्य प्रधानाच्या पेशीत आहे. जहागीर सुटली की आडगावीच मोठा गुरुवार करावा, असं मी ठरविल आहे...."

चौधऱ्याची आजची हलाखीची परिस्थिति मडळाच्या चालकानं आणि सभासदांनीं आधीच ओळखली होती की काय कोण जाणे ! किंवा ते चौध-

त्याची जहागीर सुटण्याची वाट पहात असावे ! जहागिरीची कारवाई मुख्य प्रधान 'सर रामप्रसाद' याच्या पेशीत आली होती ही गोष्ट मात्र खरी !

जागतिक कीर्तीचे एक भारतीय कवि राजधानीला आले. ब्रह्मर्षीसारखी त्यांची तेजाळ गभीर मुद्रा, आणि राजयोगाच्या सारखा त्याचा उंची रेशमी वेश सबंध राजधानीत कौतुकाचा आणि आदराचा विषय झाला होता, कवेश्वराच्या स्वागतार्थ राजधानीच्या एका भव्य थियेटरात एक समारंभ झाला!

प्रेक्षकांच्या समोरच्या रांगेत धनवतीच्या राणीसाहेब, 'शाहद बड्या' वरले सगळे जहागीरदार आणि बदे अली'च्या देवडीचे मालक, राजधानीचे मुख्य प्रधान सर रामप्रसाद बहादुर इत्यादि बडी बडी मंडळी बसली होती, कवेश्वराच्या स्वागताची प्रारंभीची काही भाषण संपताच आडगावकर चौधरी व्यासपीठावरल्या पाहुण्याच्या टेबलाजवळ आले. ती गिड्डू मूर्ति कोण, कुठली, काय करणार आणि काय बोलणार याविषयी सभेत कुतुहल माजलं!

व्यासपीठावर प्रवेश मिळविणं कठीण आहे हे जेव्हा चौधऱ्याना कळलं तेव्हां ते विचारमग्न झाले. चौधरी घराण्यातल्या मंडळीना वेळीप्रसंगी अमोल साहाय्य करणाऱ्या सिद्धीचं त्यानी आवाहन केलं असावं ! तोंच कवींद्र येत असल्याची वार्ता आली. एक भारी मोटार येऊन प्रवेशद्वाराजवळ थांबली. एकदम मोटारीच्या दाराजवळ जाऊन चौधरी गर्दी हटविण्यासाठी गरजले,

"बाजू हटो !"

कवींद्राच्या मोटारीला गराडा घातलेला प्रेक्षकांचा समुदाय बाजूला सरकला. मोटारीचं दार उघडून चौधरी कवींद्राना म्हणाले,

"पधारिये ! ...."

हा माणूस व्यवस्थापकांपैकीच कुणीतरी असावा असं कवींद्राना वाटलं. आणि कविराजांशी एवढं जवळून बोलणारी आसामी त्यांच्या परिवारापैकीच असली पाहिजे असं व्यवस्थापक समजले. मग चौधऱ्यानी व्यासपीठावरल्या खुर्चीपर्यंत त्यांची सोबत केली. कार्यक्रमात आपलं नांव नोंदविलं आणि जवळच्या कोचावरील एक रिकामी जागा त्यांनी पटकावली.

व्यासपीठावर येतांच चौधऱ्यानी पर्शियन कोटाच्या आंतल्या खिशां-तून एक कागद काढला. थोडस प्रास्ताविक केलं आणि कविराजांच्या स्तुतीन भरलेल, अनुप्रासादि अलकारानी नटलेल बहारदार कवन भरदार आवाजात सताल आणि सलय म्हणायला आरभ केला !

सभा चित्रासारखी मत्रमुग्ध झाली !

कवितेत एकटचा कविबाबूचीच स्तुति नव्हती तर राजधानीचे मुख्य प्रधान रामप्रसाद, धनवतीच्या राणीसाहेब आणि शाहदबड्यावरले ' राजा धीरकरण ' ' श्रीमत यशवतराव ' अशा विद्वत्तेचा सत्कार करणाऱ्या जहागीरदाराचाहि भरपूर गौरव होता !

कवन सपल आणि टाळचाचा कडकडाट झाला ! कविबाबूनी चौधऱ्याकड पाहून मद स्मित केल. अत्यत नम्रतेन वदन करून चौध-ऱ्यानी ते स्वीकारल. ' राजाधीरकरण ' यानी आपल्या स्थानावर उडी मारल्यासारखी केली, आणि पाठीमाग बसलेल्या सेक्रेटरीला म्हटल,

" वो गिड्डू कोण हैं ? आम्ही त्याला भेटू इच्छितो. मोठा चतुर माणूस दिसतो ! "

धनवतीच्या राणीसाहेबानी ते ऐकल त्यानी आपल्या कारभा-ऱ्याला बोलावून म्हटल,

" त्या माणसाला प्रथम माझ्या मोटारीजवळ घेऊन या ! "

श्रीमत यशवतरावजीनी तत्काळ मोटार गाठली. हेतु हा की स्तुति-पर कवन रचणाऱ्या त्या ठेगण्या माणसाला मोटारीत घालाव आणि देवडी-वर न्याव !

राजधानीचे मुख्य प्रधान सर रामप्रसाद यानी मात्र आघाडी मारली. त्यानी चौधऱ्याना बोलावून घेतल आणि म्हटलं,

" मी फार खूष झालो आहे तुमच्या कवितेवर ! मला देवडीवर येऊन भेटा ! "

चौधऱ्यानी ते निमत्रण स्वीकारताना छत्तीस ठिकाणी अंगाला बाक दिले आणि अस काही झाकदार प्रतिवदन केल की रामप्रसाद तर आणखीच खूष होऊन गेले !

चौधऱ्याच्या कवित्व शक्तीला राजलक्ष्मीनं ओळखलं होतंच पण ज्या घटनेची ते वाट पहात होते ती आपणहून आज त्याना सामोरी आली होती!

सर रामप्रसादाच निमंत्रण म्हणजे चौधऱ्याची जहागीर सुटल्याची खूणच होती!

कारण आजवर पायाला चक्र बाधून चौधऱ्यानी राजधानीचे सगळेच रस्ते घासून टाकले होते. गुलजार बाग सोडला की शाहदबडयावरल्या बहुतेक देवडया पुजून यावयाच्या. सर रामप्रसादापर्यंत पोचविणारी एकादी शिफारस तिथे मिळते काय, हे पाहण्याचा त्याचा हेतु होता. मग राजधानीच्या उत्तर टोकाला असलेला धनवतीच्या राणीचा बगला गाठायचा. राणीसाहेबाची आणि सर रामप्रसादच्या बायकोची चागली मैत्री होती या मार्गान काही कार्य कराव अशीहि त्याची खटपट चालूं होतीच! मग 'बदे अली'च्या देवडीत घुसण्याचा ते प्रयत्न करीत होते. आत प्रवेश मिळाला तरी महादेवाच दर्शन घडत नव्हत!

प्रत्यक्ष महादेवानच चौधऱ्याना आज वरदानासाठी बोलावल नव्हत काय?....

आडगावच्या जप्त झालेल्या जहागिरीची कारवाई प्रथम तहसील कचेरीतून हालता हालत नव्हती. कचेरीत चकरा घालता घालता महिने उलटले होते तरी एकादाच तख्ता तयार होण्यापलीकड काम सरकत नव्हत. तहसीलदारसाहेब घरीच काम पाहात होते. घरी सहचासाठी गेलेल्या फायली पुन्हा कचेरीत परत येत नव्हत्या तहसिलीबाहेर बसणाऱ्या एका चांभाराकड चौधऱ्यानी पायतण शिवायला दिल, तेव्हा चाभार म्हणाला,

"रावसाहेब नका या चामडयाचा जीव घेऊं आतां!"

चौधऱ्यानी उत्तर केल,

"जिथला जोडा तिथच फाडून मोकळं व्हाव, असा नियम आहे माझा!"

तहसील कचेरीन एक पायतण झिजवल होत!

चौधऱ्यानी तहसिलदाराची घरी जाऊन भेट घेतली. आणि तक्रारीच्या आवाजात म्हटल,

"हुजूर! आपण घरी कामकाज पाहता आहा. पण कचेरीत निवळ अधार माजला आहे. पेशकार आपल्या नावान पैसे खातो. मला तो

जहागिरीच्या कारवाईंत पैसे मागू लागला, आणि तेंहि आपल नांव सांगून! मी म्हटलं, "मला जे काय हजार दोन हजार द्यायचे ते हुजूरांच्या पायावर ठेवीन. तुला म्हटल एक छदामहि देणार नाही!"

ही मात्रा लागू पडली. तहसीलदारानं एक धमकीवजा चिठ्ठी कचेरीत लिहून पाठविली. आणि चौधऱ्याच्या कागदावर तत्काळ सह्या केल्या.

कागद घेऊन पसार झालेल्या चौधऱ्यामागं मग तहसीलदारान चपराशी दवडला, तेव्हा चौधरी गाडीत बसले होते आणि ती चालू झाली होती.

त्यानी ओरडून चपराशाला सागितलं, "साहेबाना सलाम सांग!"

मग जिल्हा कचेरीत चौधऱ्यानी आपली कागदपत्र दाखल केली!

कलेक्टरच्या कचेरीत आवक पत्राची नोद घ्यावयाची पद्धति अपूर्वं होती. एका दहाबारा फूट लाबीरुदीच्या खोलीत रोजच्या रोज येतील तेवढीं पत्र दरवाज्यावरल्या तावदानातून आत भाऱ्यासारखी भिरकावून दिलीं जात होती. हा क्रम अखड चालत होता. मग त्याची नोद घेणारा कारकून रजा सपवून अथवा घरी बसण्याचा कटाळा आला म्हणून किंवा पहिली तारीख असली की पगार घ्यावयाच्या दिवशी थोडतरी काम करावं अशा टोचणीन कचेरीत आला की त्या स्टोअर रूमच दार उघडत असे. पत्रांचे भारेच्या भारे तिथ पडलेले असत. हाताला येईल तेवढा एक भारा त्यातून उचलून चपराशी कारकुनाच्या पायाशी टाकीत असे. आणि रजिस्टर उघडून नोदणी घ्यावयाला आरभ होई!

आडगावच्या जहागिरीचे तक्ते त्यांतून हुडकून काढण सामान्य गोष्ट नव्हती!

कलेक्टर कचेरीतल हे लोण सुभेदारीत न्यावयाला आणि तेथून 'महकमे मालगुजारी'त आणून पोचवायाला चौधऱ्यांनी वर्षं घातली होती आणि मग ते सगळ प्रकरण सर रामप्रसादाच्या सहीसाठी त्यांनीं शिजवून ठेवलं होतं!

सर रामप्रसाद थिएटरात दिलेल निमंत्रण विसरले होते की काय न कळे! कारण पुढ कित्येक दिवस चौधऱ्यांना त्यांची भेट लाभली नव्हती. त्यांच्या प्रत्येक वाढदिवसानिमित्त चौधरी एकेक चित्रबध रचीत होते

आणि एका पुष्पहारात गुफून सर प्रसादबहादुरांना अर्पण करीत होते. असे बरेच वाढदिवस गेले तरी सर रामप्रसाद बहादुरांनी चौधऱ्यांची चौकशी केली नव्हती! मुख्य प्रधान नुसत्या 'बोला फुलानी' प्रसन्न होणारे नसावे. कारण त्याचे दोन तीन वाढदिवस गेल्यावर सेक्रेटरीन हळूच चौधऱ्याना सुचविल, "महाराजा बहादुराना नजराणा द्यावा लागेल!"

आजवर उभारलेले कर्जाचे डोंगर चौधऱ्याच्या कित्येक पिढ्यांना सारता येणार नाहीत असेच होते. नजराणा देण्यासाठी आतां कुठं डल्ला मारावा हा प्रश्न होताच. चौधऱ्यानी खोल विचार केला आणि मग सेक्रेटरीला म्हटल,

"प्रभूची सेवा करायला मी सिद्ध आहे! पण महाराजा बहादुरांनी एकदां आडगावी यावं!"

मग सबध संस्थानभर एकच बातमी पसरली.

"राजधानीचे मुख्य प्रधान सर रामप्रसाद बहादूर दौऱ्यावर निघणार!"

त्या दिवशी जामखेड स्टेशनवर चौधरी उतरले. चौधऱ्यानी एक घोडं भाड्यान केल. आणि वाजत्री बोलावून ते वाजत गाजत आडगांव रस्त्यान निघाले! दहा बारा मैल ती मिरवणूक तशीच चालली होती. रस्त्याच्या बाजूला गाव आल की चौधरी गावातल्या पाटील, पटवारी, देशमुख, देसायाना बोलावून घेत होते. आणि मानेत ताठा आणून राणीचा जाहीरनामा तोंडी सांगावा त्याप्रमाण आवेश आणि अभिमानान बोलत होते.

"सर रामप्रसाद राजधानीचे मुख्य प्रधान ही गावं पहायला जातीनं येताहेत. रस्त्यान शंभर शंभर पावलावर एकेक महार उभा करा! राजा बहादुरांच्या स्वागताची आणि उतरायची व्यवस्था आडगांवीं होतेच आहे. कांहीं नजराणा द्यावा लागेल. तो तीन चार दिवसांत माझ्याकडं आणून पोंचवा, आणि तुम्ही जातीनं हजर राहा. कुणाच्या काहीं रुसुमाच्या भानगडी असतील तर, इनामी जमिनीच्या कटकटी असतील तर त्या त्या माणसांना आडगांवी येऊन मला भेटायला सांगा!"

सरकारी रीतीन मुख्य प्रधानाच्या स्वागताची तयारी होत होतीच. जिल्हा तालुक्याचे अधिकारी हाताखालच्या माणसासह राबत होते.

आडगावात आल्यावर गावातल्या सगळ्या सधन माणसाना चौधऱ्यानी बोलावून घेतल. ती माणस चौधऱ्याशी सरळ वागणारी नव्हती. पण मुख्य प्रधानाच नाव ऐकून मात्र ती चरकली. शिवाय हा ‘ गिड्डू चौधरी ’ सामान्य नव्हता, याचीहि त्याना पूर्ण कल्पना होती ! मुख्य प्रधानाच्या स्वागतासाठी चौधऱ्याच्या सागण्याप्रमाण त्यानी रकमा ओतल्या. वरवाड्याखाली मोठा शामियाना उभारला आणि गावात वळणाऱ्या रस्त्यापासून थेट [illegible] पायघड्या आथरल्या

ठरलेल्या दिवशी एक ‘सलून ’ जामखेड स्टेशनवर थाबला. नास्ता आटोपताच सर रामप्रसाद सलूनबाहेर आले प्लॅटफॉर्मवर पगड्या आणि पट्टे घालून अधिकाऱ्याची एक राग थाबली होती तिकड सरसाहेबानीं दृष्टि टाकली, त्याच वदन स्वीकारल आणि मोटारीकड ते वळले

प्रधानाच्या प्रायव्हेट सेक्रेटरीन मोटार मागितली आहे अस कलेक्टरला चौधऱ्यानी सागून ठेवल होत मग असा देखावा दिसला की, चौधऱ्यानी घेतलेली कलेक्टरची मोटार पुढ निघून मुख्य प्रधानाच्या मोटारीच मार्गदर्शन करते आहे !

आडगावच्या वरवाड्याखाली मुख्य प्रधान काही पळच थाबले असतील. त्यानी सगळी व्यवस्था पाहिली समुदायाकड नजर वळविली आणि आलेला नजराणा स्वीकारून चौधऱ्याना म्हटल, “ मला बर वाटल ! ”

चौधऱ्याच्या पालथ्या नशिबाला सरळ करणारा हा शेवटचा सस्कार होता !

त्या दिवशी ‘ बंदेअली ’च्या देवडीबाहेर पडल्यावर चौधरी हवेत तरगल्यासारखे चालत होते ! देवडीवरला जमादार इनामासाठी त्याचा पाठलाग करीत होता. चौधऱ्याच्या पर्शियन कोटाच्या खिशात त्या वेळीं फक्त सहा साडेसहा आण्याचा खुर्दा खुळखुळत होता. मूठ भरल्याप्रमाण

त्यानी तो खुर्दा घेतला आणि गुप्त दानाप्रमाण तो जमादाराच्या शेरवानीच्या आतल्या खिशात आपल्या हातान सोडला

ते घरी आले तेव्हा गुरुवार-मडळाचे काही सदस्य हार घेऊन उभे होते. रात्री मडळाकडून एक लहानसा समारभ झाला.

अगात जहागीरदाराचा आवेश भरून मडळान केलेल्या सत्काराच उत्तर द्यायला चौधरी उठले. ते बोलू लागले,

"सन्मित्रहो ! चौधऱ्याची जहागीर सुटली म्हणून तुम्ही आपला आनद व्यक्त केलात, याचा मलाहि अत्यानद झाला पण जहागीर सुटली, या घटनेला फारस प्राधान्य द्यावयास मी तयार नाही. जहागिरी जप्त होतात आणि वीस पचवीस वर्षांच्या सतत खटपटीन त्या सुटतात ! हा एक सामान्य क्रम आहे पण एक महान् ऐतिहासिक परपरा कालाच्या उदरात गडप होऊ पहात होती. आपल्या सास्कृतिक वैशिष्ट्याचा एक पैलू आजच्या आणि उद्याच्या पिढीसाठी नष्टप्राय करण्याचा नियतीचा डाव होता ! मला तुम्हा मडळीच प्रोत्साहन आणि तुमच्या शुभेच्छाच साहाय्य नसत तर गेल्या दोन दशकाच्या पायपिटीत मी सहज खचलो असतो ! उमेदीची वर्षं मावळली तरी कालातरान का होईना, आडगावासारख्या एका आडवाटेवरल्या गावातल्या प्रजाजनाची सेवा करण्याची मला सुसधि मिळाली ! तीन चार वर्षांपूर्वीच तेथल्या प्रजाजनाचे चेहरे आम्ही पाहून आलो. त्या वेळी आम्ही कमालीचे उदास झालों होतो. गावातला सगळा उत्साह, हास्य आणि जीवनसौख्य केवळ आमच्या तेथल्या वास्तव्यावर अवलबून आहे, अस कळून आल ! " मग त्यानी एका तळहातावर दुसऱ्या हाताची मूठ आदळून बोलायला प्रारभ केला होता,

" मी तुम्हाला सागून ठेवतो कीं, " ....

वतनाच्या अभिमानाचा उन्माद माणसाला केवढ असबद्ध बरळायला लावतो त्याच हे प्रत्यतर होतं.

मग चौधऱ्यांना वाजत गाजत स्टेशनवर पोंचविण्यांत व्यायामशाळेनं सहकार केला. राजधानीच्या राजरस्त्यावरून ती मिरवणूक वाजत गाजत निघाली ती थेट स्टेशनपर्यंत !

तिसऱ्या वर्गाच्या डब्यातल्या एका बाकावर हाराचा भारा, सतरंजीची वळकटी आणि एक जुना लहानसा ट्रंक एवढ सामान ठेवण्यांत आलं. गाडी निघाली. व्यायामशाळेचा बँड झडला. वदन-प्रतिवदन झाली. या प्रकाराची चौकशी झाली तेव्हा कुणी तरी उत्तर केल,

"आडगावकर चौधऱ्याची जहागीर सुटली. ते आपल्या जहागिरीच्या गांवी आता परत जात आहेत ! हार गळयात आहेत तेच आडगावचे...."

दक्षिण ध्रुवावरल्या माणसाला उत्तर ध्रुवावरल्या राजघराण्याची माहिती सागितल्यावर जेवढा बोध होईल तेवढाच ही माहिती ऐकणाराला झाला असेल !

श्रीमत अबिकाचरणदास रावजी रावसाहेब चौधऱ्याना त्याची पर्वा नव्हती. अपूर्व उन्मादान ते बेहोष झाले होते. आपण फार उच स्थानावर चढलो आहो अस त्याना वाटत होत सभोवतालची माणस त्याना लहान आणि क्षुद्र दिसत होती. एखाद्या सामान्य सुखकारक घटनेन क्षणभर आनदी व्हाव आणि एकादी जाभई दिल्यावर पूर्वस्थितीवर याव इतका क्षुद्र आणि क्षणजीवी असा उन्माद नव्हता. वीस पचवीस वर्षांच्या श्रमाचं ते साफल्य होत !

चौध-याना ससारसुख लाभलच नव्हतं. त्याचे विचारहि त्यांनीं मनात फारसे जोरकस केले नव्हते. त्याची पहिली बायको माहेरी राहूनच आजारी झाली आणि आटोपली त्याच्या दुसऱ्या कुटुबालाहि सुखाचे दिवस दिसले नाहीत तिसऱ्या लग्नाला चौधरी तयार होते. पण हुडा मनासारखा मिळत नव्हता. मग जहागिरीच्या नादांत ते लग्नप्रसग अजिबात विसरले होते. नाही म्हणायला 'रामप्यारी' नावाच्या एका रक्षेचा पाश त्यानी आपल्या भोवती ठेवला होता. चौधऱ्याच्या नेहमीच्या धावपळीच्या जीवनात एवढच एक नाजुक रहस्य आणि शातिस्थळ होत. चौधरी तिच्या जाळयात अडकण्याऐवजी चौधऱ्यानीच तिला आपल्या जाळयांत अडकविल होत. तिन चौध-याची मन:पूर्वक शरीरसेवा केली होती. आणि त्यांना वेळी प्रसगी पैशाचीहि मदत केली होती. चौधरी कधी रात्री तिच्याकडं निवासाला येत होते. " रामप्यारी, मी फार थकलोय् ग ! "असं म्हणून शिणूब

पडत होते. मग जरा वेळानं त्याच्या थकलेल्या डोळयाना दुधाचा प्याला धरलेला एक कृष गौर आणि मोहक हात दिसत होता. थकावटीची रात्र मंद दिव्याचा सुरम्य प्रकाश, सर्वस्वाचं दान करण्याच्या आवेगान पुढं आलेला एक नाजुक हात, त्यावरील गोंदण, आणि त्या गोदणाबरोबर चमकणारे बिलवराचे रग, या सहकारात रगाना प्राधान्य होत कीं रसांचं प्रामुख्य होत, या सभ्रमात रमणं चौधऱ्याना सुखावह वाटत होत. मग तो प्याला पुढ करणाऱ्या व्यक्तीच्या काळ्याभोर डोळ्यातली तत्परता गोरसा-इतकीच त्याना मधुर वाटत होती !

जहागिरीच्या नादांत या लाडक्या पाशाचीहि चौधऱ्यांनीं फारशी कदर केली नव्हती !

एकाद्या भटभिक्षुकाच्या पोटी ते जन्माला आले असते तर गोष्ट वेगळी होती. चौधऱ्यांच्या कुळात त्याचा जन्म झाला होता.

गावकऱ्याच्या द्वेषातून खुनाखुनीच्या भानगडी निघाल्या होत्या, पुढें भावांभावातल वैर वाढल होत.आणि आडगावची जहागीर जप्त झाली होती. जहागीरदाराच्या वारसाला गांवात मान राहिला नव्हता. लोक वंदन करीत नव्हते. चौधऱ्याच्या एकेका महापुरुषानं करून ठेवलेली इस्टेट लुबाडण्याकडच गावकऱ्याचा कल होता! चौधऱ्यानी ज्याना सभाळलं आणि ज्याचं रक्षण केल तीच गावातली माणस आतां उलटली होती !

हा एक ऐतिहासिक क्रम असावा ! राजाचा उदोउदो करायचा आणि मग राजघराण धुळीला मिळवायच हे इतिहासान पाहिलं होतं पण राजकुळं पुन्हा लोकांच्या डोक्यावर आपल्या पदप्रहराचा अनुग्रह करायला सिद्धच असतात हे आता चौधरी दाखविणार होते ! चौधऱ्याचं हाड नेहमीं अधिकारपदीच राहणार होतं !

एकदां चौधरी असेच गांवांतून जात असतां त्याच्या बाजूनं एक नाग सरपटत जाऊं लागला. पाहणाऱ्यांनी ओरड केली,

" नाग ! नाग ! अरे त्याला मारा ! "

दुसऱ्या एका गांवकऱ्यानं म्हटल,

" नागाला मारण्याऐवजीं आधीं त्या चौधऱ्याची सोय पाहा ! "

तो प्रसग चौधऱ्यांच्या मनावर अगदी ठसला होता. आता जुन्या हेवेदाव्यांचा ते पुरेपुर सूड घेणार होते. तो असा की, आणखी कित्येक शतकंहि लोकांना दृष्टि वर करून चालता येऊं नये !

लोक लोक म्हणजे तरी कोण ? कोनाड्यात ठेवण्याची खेळणीं देवघरात माडण वेडेपणाच नव्हत ? चौधऱ्याच्या गेल्या कांही पिढ्यानीं अशीच चूक केली होती त्याचच प्रायश्चित्त त्याना आजवर भोगावं लागल होत !

अशा विचारात गाडीच्या लयबद्ध खडखडाटावर चौधरी तरगू लागले. जामखेडस्टेशन जवळ आल्यासारख दिसू लागल. सनई चौघड्याचा आवाज कानी येऊ लागला. वरवाड्यात एक सिंहासन तयार झाल्यासारख दिसल. त्यावर चौधरी झोकात बसले चौधरी घराण्यातल्या सगळ्या महाभागानीं आपले आशीर्वादाचे हात चौधऱ्याच्या मस्तकावर धरले. त्यानी गावांतल्या सगळ्या लोकाचा फन्ना उडवायाला आरभ केला. चौधऱ्याची जहागीर जप्त करायला तेच कारण होते. मग ते थकले असावे. दुधाचा प्याला धरलेला कृष गौर हात पुढें आला आणि चौधऱ्याचा शिणलेला मेदू क्षणभर शात झाल्यासारखा दिसू लागला......

मजुळा महारणीला अलीकड स्वप्न पडत होती ! जामखेड रस्त्यावर घुगरमाळाची खिल्लारी जोडी जुपलेला छकडा भरधाव धावत येतो आहे; छकड्यापुढ महार धावतो आहे, तो कोण ? तिचा नवरा धन्या तर नव्हे ? कुणाला माहीत ? उधळलेला छकडा मग थेट वरवाड्यापुढ थांबतो; त्यातून कोण उतरल, नीटस काही दिसत नाही, वरवाड्यात माणसांची गर्दी दिसते; आणि मग कुणी तरी तिला म्हणत,

" मजे ! बरी आहेस ना ? तशी जाऊ नकोस ! भाकर घेऊन जा ! "

तो आवाज तिला तसाच ऐकत राहावासा वाटतो. पण मग तिला एकाएकी जाग येते.

मजुळा आता थकली आहे. लोखडाचा 'आख' झिजून बारीक होत जावा आणि मग गाडीची हालचाल नीट होऊ नये तसं तिच्या प्राण-

शक्तीच झालं आहे. तिची हाड झिजली. वय उतरल. पातळ झालेले केस पाढरे झाले. आडगावच्या हवेतली मस्ती आणि जोस फाटक्या पदरावर ठसठसून उमटविणारी आणि चौधऱ्याच्या भाग्यश्रीच्या कृपाकटाक्षांत झळकणारी अत्यज कन्या मजुळा ती हीच अस आता वाटत नाही !

डोळ्यांच्या बाहुल्या हालताहेत तोवर वरवड्यावर माणसांचा गजबजाट झालेला पहावा, वाड्यात धान्याच्या राशी साठलेल्या दिसाव्या, आणि मग कुणी तरी म्हणाव," मजे ! भाकर घेऊन जा ! " अस तिला वाटत!

मग एकदा राजधानीचा कुणी तरी फार मोठा माणूस येणार म्हणून आडगावी त्याच्या व्यवस्थेसाठी आलेल्या जहागीरदारसाहेबाना तिन ओझरत आणि दुरून पाहिल कुणी तरी म्हणाल,

" जहागीरदारसाहेब आता वाड्यात कायमच राहायला येणार आहेत ! त्याची जहागीर सुटेलच आता ! ...."

तिला ते ऐकून आनद झाला आणि मिरवणुकीतल्या पालखीला दुरून हात जोडावे तसे तिन जहागीरदाराला जोडले

मुख्य प्रधानाच्या त्या स्वागत समारभाच्या गर्दीत मजीला कुणी विचारील हे अशक्यच होत तिनहि तशी अपेक्षा ठेवली नव्हती. एक गोष्ट मात्र तिला त्या वेळी नक्की कळून चुकली की वरवाड्यातली माणस आता परत राहायला येणार ! तेथल्या गृहिणीचे जीर्ण उतारे एकाद्या महावस्त्राप्रमाण ती धारण करणार, आणि तेथल्या मुलाबाळाच उष्ट आणि उरलेल शिळपाक मिष्टान्नाप्रमाण भक्तिभावान सेवन करणार !

मग पुढ कित्येक दिवस दूरच दिसावं म्हणून कपाळावर हाताचा तळवा धरून ती जामखेड रस्त्यावर बराच वेळ पहात बसत होती. गाड्याची धूळ उठत आणि उडत होती. पण जहागीरदाराची घुगरमाळाची गाडी मात्र त्यात नव्हती.

पुढ कित्येक दिवस जहागीरदार आलेच नव्हते. ते येतील कीं नाही याविषयी लोकात शकाहि निघत होत्या.

स्वप्नाखेरीज मजीचं समाधान होत नव्हत ! पण मग एके दिवशीं खरंच बातमी आली," जहागीरदार साहेब लौकरच येणार ! "

मंजीच्या हाडांत नवचैतन्य भरल. कित्येक दिवसानंतर नव्हे जन्मानंतर— मजीन वरवाड्यात प्रवेश केला. वाकलेल्या कमरेवर हात देऊन तिन तो लाब रुद वाडा झाडून काढला.

शु्द्ध आणि सौंदर्य फुलविण्याच तिच्या हाताला वरदानच होत !

ती वाड्यातून बाहेर पडली तेव्हां कुणी तरी चेष्टेखोरान तिला विचारलं, " काय मजे ! कधा येणार जहागीरदारसाहेब तुझे ! "

मजीला नक्की दिवस माहीत नव्हता. पण तो आज उद्या इतक्या-वरच आहे अस तिन सागितल.

तिच्या औत्सुक्यावर तो लबाड माणूस हसला. आणि मग गंभीर होऊन म्हणाला,

" काय एकाद्याचा पायगुण असतो पहा ! तीन चार वर्षांपूर्वी त्या जहागीरदारान या गावात पाऊल टाकल तेव्हापासून या गांवाच सुख कांहीं झालं नाही ! अन् आतां...."

आताची परिस्थिति फारच तापदायक होती ! जिकडं तिकड लोक दुष्काळाची भाषा बोलत होते. पावसाच मान गेल्या कांही वर्षांत घटल होतं. सरकारी हवामान खात्यानंहि तसच वर्तमानपत्रातून जाहीर केल होतं.

गेल्या पावसाळ्यात पडायची ती नक्षत्र पडावी तेव्हा मुळीच पडलीं नाहींत. पेरणीची वेळ टळली की पाऊस हुकला, या बुचकळ्यात शेतकरी राहिले. पहिल पीक चागल आल नाही. अर्धा पावसाळा असा गेला आणि ऑगस्ट—सप्टेंबर ओठाबरून जीभ फिरवावी तसे ओले सुके होऊन चालते झाले.

जानेवारी महिना उगवला तो दुसऱ्या पिकाचा क्षय पहायाला. दुष्का-ळाचे रिपोर्ट होऊ लागले. दुष्काळी कामाच्या योजना मंजुरीसाठीं पाठ-विण्यांत आल्या. आणि उन्हाळ्यान आडगांवांत पाय ठेवला तो सुकत चाललेल्या विहिरी चाटीत आणि पाणी आणि चाऱ्यावांचून मरूं लागलेल्या जनावरांची हाड चोखीत !

आडगांवच्या विहिरींतून पोहरे रिकामे निघूं लागले. पाणीच नाहींसं होत चालल्यामुळं गांवकऱ्याच्या तोंडचं पाणी पळाल. पाण्याच्या आसऱ्या-साठीं माणसं दुसऱ्या वस्तीला जाऊं लागली. गांव रिकामं होऊं लागलं.

मजीला तिच्या शेजाऱ्यान विचारलं, "कुठं जाणार रहायला मंजे?"

" माझ बर इचारऽस ! गवऱ्या मसनात गेल्यात माझ्या. मी कुटं जाऊं"

" येड लागलंय् मजे तुला ! महारवाड्यातली इहीर बुडाला लागली. तुझ्या त्या जहागीरदाराला लोकानी कागुद टाकून इच्यारलं चरवाड्यांतल्या आडाच ! समदा गाव मेला तरी वाड्यातल्या आडाचं पाणी मिळणार नाही अस लिहून आलय् म्हन ! वा रे तुझा जहागीरदार !"

" अरे चल् ! ज्यान त्यान आपल्या पायरीपरमान रहाव ! त्या आडाच पाणी प्यायला बामनाच्या जातीत जन्माला घालायला साग देवाला!"

हळू हळू महारवाडा खाली झाला !

मजी कपाळावर तळहात लावून जामखेड रस्त्याला दूरवर पाहण्याचा प्रयत्न करीत होती. गाड्याची धूळ उडत होती, ती येणाऱ्या नव्हे तर गाव सोडून जाणाऱ्या !

चौधरी जामखेड रोड स्टेशनवर उतरले तेव्हां सध्याकाळ टळून गेली होती. स्टेशनवर त्याना कुणी ओळखल नाही. मिणमिण जळणाऱ्या दिव्यानीच त्याच स्वागत केल ! रात्रभर तिथच थाबून सकाळी एकादं वाहन करून आडगावी जाव हा विचार त्याच्या मनाला शिवला नाही. गांव जवळ आल्यामुळं त्याची नशा आणि उन्माद तर अधिकच वाढला होता. त्या भरात ते तसेच पायी चालू लागले !

वाटेल तेवढी पायपिटी करण्याची त्यांच्या पायांना कित्येक वर्षांची सवय होती ! आडगावच्या सीमेवर त्याच अन्न खाल्लेले पाटील आणि कुलकर्णी हार घेऊन तयार असतील, रामोशी 'हलक्या'न् 'पिपाण्या' घेऊन थाबले असतील अस त्याना खात्रीपूर्वक वाटत होत !

पण गावात प्रवेश करून चरवाड्यावर जाईपर्यंत त्यांना कुत्रंहि आढळल नाही !

ज्या लोकांच्या डोक्यावर चौधरी पाय देऊन नाचू इच्छीत होते ते लोकच गावांतून नाहीसे झाले होते. चौधऱ्याच्या मुक्त सचारासाठी त्यांनीं सगळ गाव रिकामं केलं होतं न् मोकळं सोडल होत !

पण काय हे दुर्दैव !

जहागिरीची महावस्त्र घालून चौधऱ्यानी आतां कुणापुढं मिरवायचं होतं ? वीस पचवीस वर्षांच्या खटपटीनंतर मिळविलेल अपूर्व वैभव आतां कुणाला दाखवायच होत ?

वरवाड्यात दिवा नव्हता !

चौधरी वरवाड्यात प्रवेशले तेव्हा त्यांनी उजेड करून इकड तिकडं पाहिलं. कुणा एका वृद्धेचा सांगाडा त्याना दिसला, 'भोऽ ओऽ' असा विचित्र भयकारक ध्वनि त्या प्रशस्त रिकाम्या वाड्यात घुमू लागला

चौधऱ्यानी तत्काळ वाड्याची शेवटची पायरी गाठली.

त्या वेळी दिशा उजळत होत्या. प्रकाश फाकत होता झाडाचे शेंडे किरणानी न्हाऊन निघत होते.

चोखून शुष्क झालेल्या रमणीच्या स्तनाचं खाडुक झालेल रत्नाच्या प्रकाशांत दिसाव तस ते आसमत पहाटेच्या उजेडात दिसत ह'त

वसतातली प्रात काळ ! ऋतुराजाची कसलीच चिन्ह सभोवती दिसत नव्हती, आंब्याना तवर नव्हता. वृक्षाना पान नव्हती. मळ्यात पहाटचा गारवा नव्हता. हिरवळीच चिन्हहि कुठ आढळत नव्हत. वास्तू माणसावांचून रिकामे उरले होते. रान उपेक्षून पडली होती !

एकाद्या उजाड महालात नट्टापट्टा केलेल्या एकाद्या कुटिणीन उगीच रंगसंगाच्या लालचीन शिराव तशी आडगावात प्रवेशलेली ती प्रभात वाटत होती !

एवढा उजेड असतानाहि चौधऱ्याना अंधार दिसू लागला. त्यांच्या डोळ्यापुढ अधारी येऊ लागली. घसा कोरडा पडू लागला. गावात कुठंहि त्याना पाणी दिसल नाही. मग पाण्याजवळ असाव म्हणून ते धावू लागले. तसतशी त्याना अधिकाधिक तहान लागू लागली....



२८–४–५३ ]

**कै. प्रिय बी. आर. कुलकर्णी,**

—तुम्ही कादबरी लिहून दिलीत
आणि ती प्रकाशित झालेली
पाह्यला राह्यला नाहीत. याबद्दल
अत्यत रुखरुख लागून आहे.
—आज तुम्ही हवे होतेत.
तुमच्या स्नेहांस पारखा झालेला,

तुमचा,

२७।१०।५४ **पंडित अनंत कुलकर्णी**

